

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








## गणराज्य दिन विशेषांक १९६९

फेब्रुवारी १९६९ • वर्ष २४ वे • मूल्य २ रु.

## श्रे य ना मा व ली



## ए के का चा चं द्र

• मासिक व्यंगचित्रमाला •


टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु. + रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57 DIPAVALI ; Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay–4.




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४
टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :
३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.
● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : **श्री. दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१,खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# २६ जानेवारी ! आत्मपरीक्षणाचा दिवस !

माणसाचा स्वभाव तसा गणितीच ! हिशोबी ! वैयक्तिक जीवनातसुद्धा माणसे गणिती हिशोब करीत करीतच आयुष्य काढीत असतात. आयुष्यात गणित विषय कच्चा असला तरी असली गणिते चुकू नयेत यासाठी ती सदैव तशी दक्षच असतात, आणि तरीही कधीकधी गणिते चुकतात आणि मग गणिते कां चुकली, कोणत्या 'आकड्या'ने दगा दिला वा कोणती 'रीत' चुकली ह्याचा ती विचार करीत राहतातच. त्याला आत्मपरीक्षण म्हटले जाते. सिंहावलोकनही कुणी म्हणतात. पण ते केले आणि चुका कबूल करण्याचा प्रामाणिकपणा माणसात असला तर गणिते नव्याने मांडली जातात, आणि नवी वाटचाल सुरू होते. वैयक्तिक जीवनातला हा हिशोबीपणा समूह जीवनातही आवश्यक आहे. कारणाकारणाने हे नफातोटयाचे गणित समूहाने मांडले पाहिजे. कारण समूहाचे गणित चुकले की जी हानी होते ती व्यक्तीची असत नाही. ती एखाद्या समूहाची, वंशाची, संस्कृतीचीसुद्धा असू शकते !

इंडिया याने भारत ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या ह्या मानव समूहाला एक 'नवी टोपी' घालून जीवन जगण्याची प्रेरणा देणारा दिवस १५ ऑगस्ट १९४७ ला उगवला व त्या प्रेरणेला शिक्कामोर्तब झाले ते २६ जानेवारी १९५० ला. काही मूलभूत अधिकार देऊन ह्या मानवसमूहाने आपले गणिती पान उघडले. आज त्याला १९ वर्षे झाली आहेत. म्हणजे हा मानवसमूह वयात आला आहे. सज्ञान झाला आहे. त्याने आता स्वतःच्या पायावर उभे रहावे व जीवनातील नफा-तोटयाचे गणित मांडावे अशी अपेक्षा सारे जग करीत आहे.

कुठून निघालो आपण ? कुठे पोहचलो आहोत ? काय गमावले ? काय कमावले ? गमावले ते मौलिक होते काय ? आणि जे कमावले ते नेमके काय ? आपण गणिताला एकूण भितोच. त्यामुळे 'रीती'च्या गप्पा खूप मारतो. "नीती"ही खूप सांगतो. शब्दांच्या सुंदर झुलीखाली आपले पराभवसुद्धा सजवून, नटवून मांडण्याचा प्रयत्न करतो. आपला भ्रमनिरास झालेला असूनही आपले हट्ट सोडायला आपण तयार होत नाही ! 'आग सोमेश्वरी, बंब रामेश्वरी' असला प्रकार करतो. मूलभूत विचार करण्याऐवजी मलमपट्टया बांधून 'रोग' बरे होतील अशी वांझ अपेक्षा करीत बसतो. देशभक्ती हा धर्म मानणारांना धारेवर धरतो आणि आमच्या अस्तित्वालाच मुळी चूड लावायला निघालेल्या माणसांना 'लोकशाही' ह्या गोंडस शब्दाचे संरक्षण–कवच बहाल करतो. भाषिक भांडणे भांडतो. 'काश्मीर'चे राज्य परकीयांच्या हाती दहा वर्षे सोपवा अशा तऱ्हेच्या सूचना आमचे माजी गव्हर्नर जनरलच करतात. जणु काश्मीरच्या खातर गेल्या वीस वर्षात सांडले ते भारतीय रक्त नव्हते, पाणी होते. भारतीय जनतेने ओतलेला कोटयवधींचा पैसा पैसा नव्हता. ते होते दगड ! श्यामा प्रसादांपासून ते हमीदपर्यंत मेली ती माणसे माणसे नव्हती. त्यांचे आणि राजाजींचे जणु नाते नव्हतेच. वीस वर्षानंतरही एकात्मता परिषदा घ्याव्या लागतात. आपली भूमी परक्यांना दान केल्याबद्दल शांतपणे सत्याग्रह करणारे 'विनोदविषय' होतात. आणि उघड शत्रुत्व करणारे मोकाट सुटू शकतात. इतिहास बदलण्याचे हास्यास्पद खेळ खेळून ऐक्याचा चेंडू आमच्या पाटीत स्वतः होऊन उडून येईल अशी वांझ अपेक्षा आम्ही अजून करू शकतो. संस्कृती ही मनात असते, रक्तात असते, ती बाह्य उपाधी नसते हे आम्हाला वीस वर्षात कळले नाही. नेफा, लडाख, काश्मीर, कच्छ, आदि भागात आम्ही 'भूमिदान' केले तर पूर्व सीमेवर नागा, मिझो, आसाम टेकडयातून एक शत्रुप्रवृत्ती पोसली. "धर्म बदलला म्हणजेच राष्ट्रीयत्व बदलते" हा इतिहास व अनुभवसिद्ध सिद्धांत आम्ही हास्यास्पद मानला. साध्य–साधन विवेकही सुटला. आणि भोवती मित्रांपेक्षा शत्रूंचीच वीण वाढविली, आणि शिक्षणविषयक धोरणामुळे सर्व विद्यार्थि जगात बेदिली माजवली. स्वातंत्र्यपूर्व काला‌‌त दक्षिणेत हिंदी प्रचार हा धर्म मानला जात होता आता ते विष मानले जाते. पक्षीय राजकारणाने प्रांतोप्रांती 'सत्ता' हा नवा युगधर्म आम्ही वाढू दिला: आणि देशविच्छेदनाला जी वृत्ती कारणीभूत झाली तिला आशिर्वाद लाभू लागले. खरोखरच आम्ही साधले काय? कुठे आहोत ? स्वातंत्र्यपूर्व कालात आम्ही खरोखरच एकात्म होतो काय ? की ती एकात्मता प्रतिक्रियारूप होती ? स्पष्ट व स्वच्छ चिंतन व्हायला हवे आहे. मलमपट्टया फार झाल्या. मुळातच निदान व्हायला हवे आहे. आणि आता वयात आल्यावर हे गणित आम्ही सुबुद्धपणे मांडले पाहिजे. "की जय !" म्हणून जय मिळत नाहीत. जय मिळविण्यासाठी समूहाचे गणित जुळावे लागते. योग्य रीत आणि योग्य नीती यांचा आश्रय केला पाहिजे. इतिहासाची पुस्तके बदलून 'इतिहास' बदलत नाहीत. नवे 'इतिहास' घडविता येत नाहीत

**–संपादक**











## हा 'हाल्डेन कोणता ?

स. नमस्कार वि. वि.

गेल्या दीपावलीच्या अंकांत (जानेवारी), श्री. प्र. ना. परांजपे यांनी "आणखी कोणी हाल्डेन आहे का ?"— अशी पृच्छा केली आहे. माझ्या गोष्टीत उल्लेख करण्यात आलेला हाल्डेन म्हणजे शास्त्रज्ञ जे. बी. एस. हाल्डेन (१८९२ ते १९६५) यांचे वडील जॉक स्कॉट हाल्डेन (१८६० ते १९३६). मूला इतकेच तेही मोठे शास्त्रज्ञ होते.

त्यांना 'गेल्या शतकात' घातल्यामुळे गैरसमज झाला असल्यास दिलगीर आहे.

प्रतापगंज, आपला
वडोदे—२ **द. ग. गोडसे**

## दर्जेदार साहित्याची निवड

स. न. वि. वि.

'महाराष्ट्र टाईम्स'च्या पहाणीत पहिल्या पाच कथांमध्ये 'दीपावली' मधील दोन कथा आल्या आहेत यावद्दल मनःपूर्वक अभिनंदन ! 'दीपावली' ची साहित्याची निवड किती दर्जेदार असते आणि चोखंदळ असते हे यावरून दिसून येते. असाच वहुमान आपणांस सदैव लाभो हीच सदिच्छा !

४५, शनिवार पेठ, आपला
पुणे—२. **पंडित क्षीरसागर**

## सावलीतील जिवंत पात्रे—

स. न. वि. वि.

'दीपावली'चा जानेवारीचा अंक वाचून काय वाटले ते कळवीत आहे. प्रथमच चित्त वेधून घतले ते'परशुरामाच्या सांवली'-ने. श्री. रवींद्र पिंगे यांचे व्यक्तीचित्रण इतके प्रभावी आहे की कादंवरीतील पात्रे आपल्या परिचयातलीच, नेहमीच्या पाहण्यातलीच आहेत असा भास होतो. पण कादंवरी अपूर्ण असल्याने चुटपुट लागून राहिली आहे. पुढील प्रकरणे केव्हा वाचावयास मिळतील असे वाटत आहे, यातच या कादंवरीचे यश साठवलेले आहे.

श्री. ह. शि. खरात यांनी संगीतिकेतून घडविलेले कांद्याच्या चाळीचे दर्शन गंमतीचे वाटले. श्री राजेंद्र वनहट्टी यांची हट्टी उषा वापाने टाकलेल्या जाळचात अडकून लग्न उरकून घेते ही कथेला दिलेली कलाटणी मजेदार वाटली.

आणखी एका साहित्याचा उल्लेख करावयाचा म्हणजे प्रा. म. वा. धोंड यांनी 'आनंदी गोपाळ' या कादंवरीवर उडविलेल्या टीकेचा. त्यांनी ठिकठिकाणी आधार देऊन या चरित्रात्मक कादंवरीतील अक्षम्य चुका कुणाचीही भीड-मुर्वत न ठेवता दाखवून दिल्या आहेत. कादंवरीचे लेखक श्री. श्री. ज. जोशी यांनी त्यांच्या टीकेची दखल घेऊन पुढील आवृत्तीत सुधारणा केली पाहिजे.

असेच उत्तमोत्तम साहित्य 'दीपावली'-कडून दर महिन्याला मिळो हीच अपेक्षा!

चाळीसगाव आपली विश्वासू
जि. जळगांव **सौ. निर्मला प्रधान**

## टीकेच्या प्रकाशात पुन्हा वाचन

स. न. वि. वि.

'दीपावली' चा जानेवारी १९६९ चा अंक वाचून कालच संपवला. ह्या अंकातील वैशिष्टच म्हणजे श्री. रवींद्र पिंगे यांची "परशुरामाची सावली" ही कादंवरी होय. परंतु आपण तिचा फक्त एकच भाग प्रसिद्ध केल्यामुळे वराचसा विरस झाला. इतर कथाही चांगल्या वाचनीय आहेत. ह्या अंकातील "आनंदी गोपाळ"वरील श्री. म. वा. धोंड ह्यांनी केलेली टीका अप्रतिमच आहे. त्यामुळे ही कादंवरी मी पुनः वाचायला घेतली आहे. आणि टीकेच्या नव्या प्रकाशांत वाचताना काही तरी निराळेच वाटत आहे.

मेजर चंद्रकान्त या नाटकावरील परीक्षण फारच चांगले वाटले. ह्यामुळे नाटक पहाण्याची उत्सुकता निर्माण झाली आहे.

गिरगांव आपला
मुंबई—४ **—रवींद्र राईलकर**

## सर्वांगपूर्ण दर्जेदार अंक

सप्रेम नमस्कार

आपल्या 'दीपावली' चा दिवाळी अंक आजच वाचून पुरा केला. मराठीत जे काही थोडे अंक अथपासून इतिपर्यंत वाचावे वाटतात अशात 'दीपावली' चा नंवर वरच्या दर्जाचा वाटला इतका तो सर्वांगपूर्ण व दर्जेदार आपण संपादिला आहे. आपली रेखाटने व त्यातली सहजता ही आजच्या जीवनाला आदर्शभूत होणारी आहेत.

सर्व कथा, कविता, लेख वाचनीय तर आहेतच ; पण त्यात आपण कादंवरी स्पर्धेच्या घुसळचातून वर आणलेले नवनीत म्हणजे 'प्रतीक्षे'चं फळ. श्री. प्रभाकर पेंढारकरांचे हार्दिक स्वागत ! या कादंवरीवरून रसिकांना उत्तरोत्तर अधिक वाचनीय वाङ्मीन रसप्रदान करणार याची खात्री झाली. ही कादंवरी त्यांची पहिली आहे असं सांगावं लागेल इतकी ती सिद्धहस्त झाली आहे. कादंवरीत मन तंद्रुप होऊन जाते की ती केव्हा संपली हे समजत नाही इतकी भावसमाधी लागते. 'प्रतीक्षे'चा चित्रपट होणे जरुरीचे आहे. श्री. प्रभाकर त्यांत लक्ष पुरवतील अशी आशा आहे.

आपला स्नेहांकित
सोलापूर—१ **रा. श्री. पंचवाघ**

अनुक्रमणिका



# जागतिक परिस्थिती आणि भारतावर होणारे परिणाम

—पां. वा. गाडगीळ

हा लेख प्रसिद्ध होईल त्यापूर्वी ४० दिवसांच्या अंतराने मी तो लिहीत आहे. आजचे धकाधकी खेळणारे जग फार मोठे झाले असून जगाच्या एका भागात होणाऱ्या अचानक घटनांचे परिणाम जगाला मोठा हादरा देणारे ठरतात व परिस्थितीत कल्पनातीत पालट होतो. पहिल्या महायुद्धापूर्वी धकाधकी खेळणारे जग फार लहान होते. पहिल्या महायुद्धाने ते फार वाढले. दुसऱ्या महायुद्धाने ते आणखी वाढले. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या जगात धकाधकीचा मामला फारच वाढला. पहिल्या महायुद्धापूर्वी जगाच्या एकाद्या भागात घडलेली घटना इतर दूरच्या जगाची झोपमोडही करीत नसे. आज सारे जग, जणू काही, रोज २४ तास व असे बाराही महिने डोळे वटारून जागत बसले असून कुठे थोडे खुट्ट झाले की विजापूरच्या मशिदीतल्या प्रमाणे त्याचे ध्वनि प्रतिध्वनी अधिकच मोठ्याने सर्वत्र ऐकू येतात. तेव्हा आज हा लेख मी लिहून संपादकांना पाठविल्यानंतरच्या चाळीस दिवसात माझे हे सारे लिखाण फोल ठरविणाऱ्या घटना घडणार नाहीत अशी माझी मलाच खात्री नाही. फक्त आजच्या माहितीवरून मला काय वाटते ते मी सांगू शकतो.

गेल्या ऑगस्टच्या दि. २०–२१ च्या मध्यरात्रीनंतर रशियाने पोलंड, पूर्व-जर्मनी, हंगेरी, बल्गेरिया या राष्ट्रांचे साहाय्य घेऊन सैन्य, टॅंक्स, विमाने यांनिशी झेकोस्लोव्हाकियावर झडप घातली येथून जागतिक परिस्थितीच्या पाहणीस सुरवात करू. ती घटना अशीच होती की तिने जगाला हादरा दिला. पण जगाच्या इतिहासाचा कालखंड संपूर्ण बदलला अशीही या घटनेने जगाला जाणीव दिली.

१९१४ साली त्यावेळच्या ऑस्ट्रो-हंगेरीयन साम्राज्याच्या बादशहाच्या राजपुत्राचा खून झाला आणि पहिले जागतिक युद्ध सुरू झाले. १९३१ ते १९३९ या कालखंडात जपानने मांच्यूरिया गिळला, इटालीने इथिओपिया गिळला, जर्मनीने ऱ्हूर गिळला, ऑस्ट्रिया गिळला व झेकोस्लोव्हाकिया व्यापला. तरी युद्ध माजले नाही. पण युद्ध जवळ येत आहे असे दिसत होते व इटाली, जर्मनी, जपान ही राष्ट्रे युद्धाच्या आव्हानाच्या डरकाळ्या फोडीत होती. शेवटी जर्मनीने पोलंडवर आक्रमण केले व दुसरे महायुद्ध सुरू झाले. दुसऱ्या महायुद्धानंतर एक अगदी नवा कालखंड सुरू झाला. इतिहासात ती अगदी नवी गोष्ट होती. साम्राज्यवादी राष्ट्रे राजीखुशीने आपल्या अंकितांना स्वातंत्र्य देऊ लागली व या मुक्तराष्ट्रांचे संसार व्यवस्थित चालू लागावे यासाठी त्यांना मदत करू लागली. सासऱ्याने जावयाला मुलगी देऊन त्याला मुंबईत राहायला ५ खोल्यांचा मोठा फ्लॅट द्यावा असे हे स्वातंत्र्यदानाचे व सालंकृत कन्यादानाचे युग दुसऱ्या महायुद्धानंतरच्या जगात अवतरले. याला अल्जेरिया हा अपवाद होता. पाच वर्षेपर्यंत अल्जेरियाने फ्रेंच साम्राज्य सत्तेशी घनघोर लढा दिला. तेव्हा अल्जेरियाला स्वातंत्र्य मिळाले. पण फ्रान्समध्ये चार्लस् द गॉल राष्ट्रपती झाल्यावर त्याने अल्जेरियाला जेव्हा स्वातंत्र्य दिले त्यावेळी राष्ट्रपतीविरुद्ध फ्रेंच सेनापतींनी बंड केले, तरीही राष्ट्रपतीने ते बंड चेचून काढले, आणि अल्जेरियाला स्वातंत्र्य देण्याच्या निर्धारापासून माघार घेतली नाही. नंतर फ्रान्सने एकामागून एक अंकित राष्ट्रे स्वतंत्र करून त्या सर्वांना संसार थाटण्याला विविध मदत केली.

## जागतिक युद्ध कोणालाही नको

दुसऱ्या महायुद्धानंतरच्या कालखंडाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे ते हे की आता जो तो युद्ध नको म्हणतो, युद्ध टाळण्यासाठी झटतो, युद्धविरोधी प्रचार करतो. यातही अपवाद घडले. उत्तर कोरियाने १९५० साली दक्षिण कोरियावर आक्रमण करताच अमेरिका प्रभृती राष्ट्रांनी उत्तर कोरियाविरुद्ध रणात उडी घेतली. पण युद्धाचे क्षेत्र वाढू नये, जागतिक युद्ध होऊ नये अशी खटपट दोन्ही बाजूंनी झाली. त्या युद्धात अमेरिकेने ॲटमबॉंब वापरला असता तर जागतिक युद्ध झाले असते या भीतीने अमेरिकन जनतेने व अमेरिकेच्या मित्र राष्ट्रांनीही अमेरिकेला ॲटम बॉंब



अनुक्रमणिका

वापरण्यापासून परावृत्त केले व ॲटम बाँबवांचन लढायचे तर नुसतेच मरत राहावे लागेल, युद्ध जिंकता यणार नाही हे लक्षात घेऊन अमेरिकेने कोरियन युद्धातून माघार घेतली. ब्रिटनने ईजिप्तकडून सुएझ कालवा प्रदेश जिंकून घेण्यासाठी फरान्स व इस्रायल यांच्यासह १९५६-मध्ये ईजिप्तवर सशस्त्र हल्ला केला; पण अमेरिकेला ब्रिटनच्या या आक्रमणाचा इतका संताप आला की अमेरिकेने ब्रिटनला माघार घ्यायला तर लावलेच, पण ॲन्थनी एडन या ज्या ब्रिटिश पंतप्रधानाने ईजिप्तवरील स्वारीचा निर्णय ठरवून अमलात आणला त्याने पंतप्रधानकी सोडल्याशिवाय ब्रिटनला आर्थिक साहाय्य देण्याचे अमेरिकेने नाकारले. त्याच सुमारास हंगेरीत कम्युनिस्ट सत्तेत रशियावादी व रशियाविरोधी गटात यादवी माजली. तेव्हा रशियावादी गटास पाठिंबा देण्यासाठी रशियाने हजारो टँक्सनिशी हंगेरीवर स्वारी करून रशियाविरोधी गटाला चिरडून टाकले. पण रशियाच्या या आक्रमणाला कोणाही मोठ्या राष्ट्राने प्रतिकार केला नाही. असे का झाले ? कोणालाही मोठे युद्ध भडकायला नको होते म्हणून लहान राष्ट्रांवर शेजारचे राष्ट्र आक्रमण करीत असता वडी राष्ट्रे गोमुखीत हात घालून युद्ध—विरोधाचा जप करीत बसली होती. हंगेरीतून रशियाने आपली सैन्ये काढून तरी घेतली, पण झेकोस्लोव्हाकियात रशियाने घातलेली सैन्ये रशियाने अजून मागे घेतलीच नाहीत. बहुधा झेकोस्लोव्हाकियात रशिया थोडेफार सैन्य कायम ठेवणार व झेक सरकारने रशियाला हवा असाच कम्युनिझम् झेकोस्लोव्हाकियात चालविला पाहिजे अशी सक्ती रशिया झेकोस्लोव्हाकियावर करणार असे दिसत आहे. आंतरराष्ट्रीय कायदा व रूढी यांचा विचार केला तर जर्मनीने ऑस्ट्रियावर अथवा पोलंडवर हल्ला केला, जपानने मांच्यूरिया गिळला, इटालीने एथिओपिआ गिळला, ब्रिटनने ईजिप्तवर स्वारी केली

**गेल्या ऑगस्ट १९६८ मध्ये सोव्हिएत रशियाने सैन्य, टँक्स, विमाने इत्यादींनिशी झेकोस्लोव्हाकियावर झडप घातली या घटनेचे, आंतरराष्ट्रीय राजकारणाचा सतत अभ्यास करणारे विद्वान लेखक पां. वा. गाडगीळ यांनी कलेले हे विश्लेषण........**

ही जशी सारी आंतरराष्ट्रीय पापे होत तशा त्या पापापेक्षा रशियाने झेकोस्लोव्हाकियावर केलेला हल्ला हे कोणत्याही अर्थाने कमी पाप नव्हे; पण यावेळी या आक्रमणाची जगभर झालेली प्रतिक्रिया, आजवर झालेल्या कोणत्याही कालखंडात अशा आक्रमणास झालेल्या प्रतिक्रियांहून वेगळी आहे.

## दुर्बलांना साहाय्य करण्याचे युग

पहिल्या महायुद्धापूर्वीच्या शेकडो वर्षात अशी आक्रमणे होत तेव्हा त्या दोन राष्ट्रांखेरीज बाकीची राष्ट्रे आपापला स्वार्थ पाहून कोणती तरी बाजू घेत अथवा तटस्थ राहात. त्यातून जागतिक युद्ध होत नसे अथवा अशा आक्रमणास नैतिक स्वरूप येत नसे. १९१४ साली ऑस्ट्रेलियन राजपुत्राच्या खुनातून जर्मनीने आक्रमणाला निमित्त मिळविले पण त्यातून जागतिक युद्ध झाले व जर्मनीचा पराभव झाल्यावर त्याला अनीतीमान ठरविण्यात येऊन वडचा राष्ट्रांनी त्याला शासन केले. दोन युद्धांच्या दरम्यान १९३१ ते १९३९ या काळात झालेल्या प्रत्येक आक्रमणाने जागतिक युद्ध आणले नाही, पण ती आक्रमणे अनैतिक आहेत असे मानले गेले, त्यांचा खूप बोभाटा झाला व अखेर अशा आक्रमणातूनच महायुद्ध पेटून ते जगभर पसरले. त्यात जर्मनी, इटाली व जपान या राष्ट्रांचा पराभव होऊन त्या राष्ट्रांना कडक शासनही करण्यात आले. या दुसऱ्या महायुद्धानंतर, वर म्हटल्याप्रमाणे साम्राज्यशाहीचा लोप होऊ लागून साम्राज्यवादी राष्ट्रांनी अंकित राष्ट्रांना मुक्त केले, त्यांना त्यांचा संसार थाटण्यास साहाय्य केले, इतकेच नव्हे तर जर्मनी, इटाली व जपान या पराभूत होऊन अनीतीमान ठरविण्यात आलेल्या व कडक शासन घडविलेल्या राष्ट्रांनाही पश्चिमी विजयी राष्ट्रांनी आर्थिक साहाय्य करून पुन्हा धनसंपन्न होण्यास साहाय्य केले, पण त्यांच्या दाढा, दात, सुळे, नखे कापून काढून त्यांना आक्रमणास असमर्थ केले. तसेच ईजिप्तवरील ब्रिटनचे आक्रमण पश्चिमी राष्ट्रांनीच मागे खेचले व कोरियातून अमेरिकेने खुषीने माघार घेऊन विएतनाममध्ये अमेरिका तेच करीत आहे. म्हणजे दुसऱ्या महायुद्धानंतरचा हा सारा कालखंड अनाक्रमणाचा, आक्रमण थांबविण्याचा, साम्राज्य संपविण्याचा व दुर्बलांना साहाय्य करण्याचा, युद्ध टाळण्याचा, युद्धातून माघार घेण्याचा असताही झेकोस्लोव्हाकियावर रशियाने आक्रमण करून, वाघाने हरिणाला नुसत्या एका पायाच्या पंजाने पाडावे त्याप्रमाणे, रशियाने झेकोस्लोव्हाकियाला पाडले आणि त्याजवरचा आपला पंजा रशिया मागेही घेत नाही तरीही पश्चिमी जग या प्रकाराकडे निमूटपणे पाहात आहे याचा अर्थ काय ?

यात काही तरी नवे आहे, यात नवा कालखंड सुरू होत असल्याचे लक्षण दिसत आहे म्हणून या प्रकाराची अधिक खोल तपासणी केली पाहिजे. रशियाच्या झेकोस्लोव्हाकियावरील आक्रमणानंतर सारे जग हादरले, पश्चिमी राष्ट्रांनी तर रशियाचा निषेध केलाच, पण चीन व युगोस्लाव्हिया या एकमेकांचे शत्रू असलेल्या कम्युनिस्ट राष्ट्रांनीही रशियाचा निषेध केला. पण पुढे काय ? युनोमध्ये झेक प्रतिनिधीने फिर्याद नोंदविली पण रशियाचा विळखा घट्ट बसताच बिचाऱ्या झेक प्रतिनिधीने मुकाट्याने माघार घेतली व युनोमध्ये रशियन आक्रमणाचा निषेधही कोणी केला नाही. नंतर पश्चिमी जग आणखी पुढे गेले आहे. रशियाने झेकोस्लोव्हाकिया-

वर आक्रमण करून आक्रमण कायम ठेवले तरी "रशियाचा हेतू साम्राज्य-विस्ताराचा नाही, रशियाला फक्त स्वतःच्या संरक्षणाची काळजी घ्यायची आहे, काही अंशी रशियाचा हा फक्त घरगुती प्रश्न आहे, रशियाला युद्ध माजवायचे नाही, रशियाला शासन करण्याची भाषा बोलून अधिक दुखवू नका, युद्धाचे वातावरण वाढवू नका" असे पश्चिमी राष्ट्रे एकमेकांना सांगत आहेत. आणि तरीही रशिया कांगाव-खोरपणे बोलतो आहे की, "झेक प्रकरणाचे निमित्त करून पश्चिमी राष्ट्रे युद्ध माज-विण्याचा कट करीत आहेत, त्यांना कम्यु-निझमचा नायनाट करायचा आहे, त्यांना युद्धे हवे आहे, रशियाला शांतता हवी आहे" वगैरे. म्हणजे आता पश्चिमी राष्ट्रांनी युद्धे थांबविली, साम्राज्ये सोडली, आक्रमणे मागे घेतली अथवा मोडून काढली, पण रशियाला मात्र आक्रमणाचा हक्क व अधिकार उरला अथवा नवा मिळाला असे मानायचे की काय? रशि-याचे वर्तन व पश्चिमी जगाची त्याबाबतची प्रतिक्रिया यांचे स्वरूप काहीसे रानटी व इतिहासाची चाके मागे खेचणारे दिसते. जुन्या काळी एखाद्या रानवटाची एखादी वायको त्याला रस्त्यावर आढळली व तिच्या वर्तनाचा त्याला संशय आला तर तो तिला पकडून झिंज्या धरून फरफटत व जोडच्यांनी मारीत घरी ओढून नेत असे आणि गावातली माणसे, शेजारी-पाजारी यांना हे सारे नापसंत वाटले व त्यांनी दृष्टी फिरवून अरेरे हाय हाय असे चीत्कार केले तरी अखेर नवरा आपल्या वायको-वर लग्नाचा अधिकार गाजवतो आहे, आपण या भांडणात पडू नये अशा विचाराने गावकरी व शेजारी उगी राहात. त्याप्रमाणे पश्चिमी राष्ट्रे रशियाच्या वर्तनाबावत आज तटस्थ राहात असून इतरांच्या वायकांना हा रानदांडगा माणूस त्रास देणार नाही असा त्यांना आत्मविश्वास वाटत असावा असे दिसते.

## ही पहिलीच दांडगाई नव्हे!

रानवटाने वायकोला फरफटत ओढून जोडच्याने मारल्याचा दृष्टांत केवळ रुक्ष विषयात थोडेसे लालित्य आणण्यासाठी दिला नाही. रशियाचे झेकोस्लोव्हाकिया-वरील आक्रमण रानटी व आजच्या आंतर-राष्ट्रीय कायद्याचा, नीतीचा भंग करणारे आहे यात शंकाच नाही. पण झेकोस्लोव्हा-कियावर रशिया नवरेगिरीचा हक्क गाज-वितो या म्हणण्यामागे थोडा इतिहासही आहे. रशियाने ही दांडगाई आज प्रथमच केलेली नाही. दुसऱ्या महायुद्धाच्या आरंभी जर्मनीने पोलंडवर हल्ला पश्चिमेच्या बाजूने केल्यावर पूर्वेच्या बाजूने रशियाने पोलंडवर चाल केली व दोन खाटकांनी बकरे निम्मेनिम्मे कापून घ्यावे त्याप्रमाणे जर्मनी व रशिया यांनी पोलंड निम्मेनिम्मे कापून घेतले. पुढे त्याच युद्धात जर्मनीने रशियापाशी युद्ध सुरू केल्यानंतर रशिया व पश्चिमी राष्ट्रे यांची जर्मनीविरुद्ध एक-जूट झाली आणि त्या युद्धात जर्मनीचा पराभव होऊन जर्मनीला आक्रमणाबद्दल शासन मिळाले. पण रशियाने पोलंडला अर्धे कापून खाल्ले त्याबद्दल रशियाला शासनही झाले नाही अथवा गिळलेला पोलंड ओकावाही लागला नाही. उलट जर्मनी-पासून पूर्व युरोपीय राष्ट्रे युद्धात मुक्त करण्यासाठी रशियाने पूर्व युरोपीय राष्ट्रात जी सैन्ये एकदा घातली ती पुन्हा मागे घेतलीच नाहीत आणि त्या सैन्यांच्या बळावर तेथे जुन्या सत्ताधाऱ्यांचा पाडाव करून कम्युनिस्ट राज्येही स्थापली. जर्म-नीने केलेल्या आक्रमणाबद्दल ज्या पश्चिमी राष्ट्रांनी आकांडतांडव केले त्यांनी रशियाचे हे वर्तन कां सहन केले ?

इतिहास, कोणास विचित्र वाटो पण, खरोखरच असा घडला आहे की अमेरि-केचा राष्ट्रपती रूझवेल्ट याने रशियाचा हुकुमशहा स्टालिन यास तशी परवानगीच दिली होती. १९४५ च्या फेब्रुवारीत रशि-यातील क्रिमिया प्रांतात माल्टा येथे जर्मनी-विरोधी राष्ट्रांची परिषद झाली. जर्मनीचा पराभव त्यावेळी स्पष्ट दिसत होता व युद्धानंतरची निरवानिरव करण्यासाठी हे मित्र जमले होते. युरोपात युद्ध सुरू झाले की अमेरिकेला युद्धात पडावे लागते. आणि अमेरिकन जनतेला युद्धाला अनुकूल करून घेण्यासाठी इतके प्रयास पडतात व इतका वेळ जातो की दरम्यान युरोपचा नाश झालेला असतो आणि ते युरोपीय युद्ध सर्वानाच फार महाग पडते हा अनुभव एका ३० वर्षांत दोनदा आला. तेव्हा

**खरा चंद्र आणि खोटा चंद्र !**




**बडे व्यापारी आणि कारखानदार यांनी कमी रकमांच्या योजनांचा आग्रह धरला आहे.**

युरोपात पुन्हा युद्ध होऊ नये अशी तजवीज करणे रुझवेल्टला इष्ट वाटले. जर्मनीचा धोका युरोपला मोठा असून पश्चिम युरोपवर जर्मनी भावी काळात स्वारी करू शकणार नाही अशी तजवीज करणे शक्य होते; पण जर्मनीची रशियातील युक्रेनबद्दल सनातन आकांक्षा असून पूर्व युरोपातील लहान लहान राष्ट्रे जर्मनीचे केव्हाही भक्ष्य होतील एवढी दुबळी होती. यामुळे रशियाला जर्मनीपासून सुरक्षितता मिळायची असेल तर पूर्व युरोपीय राष्ट्रे हे रशियाचे वर्चस्व क्षेत्र बनेल अशी तरतूद रुझवेल्टने करून द्यावी अशी मागणी स्टालिनने माल्टा येथे केली व रुझवेल्टने चर्चिलला विश्वासात न घेता त्यावेळी ती मान्य केली अशी अफवा-वजा वातमी माल्टा परिषदेच्या वेळीच पसरली होती. पुढे घडलेल्या इतिहासाने ती अफवा सिद्ध केली. भोळ्या रुझवेल्टला लबाड स्टालिनने बनविले अशी टीका त्यावेळी रुझवेल्ट व स्टालिन या दोघांवरही झाली. पण युरोपात पुन्हा युद्ध होऊ नये व अमेरिकेला त्या युद्धासाठी युरोपात पुन्हा यावे लागू नये यासाठी रुझवेल्टला त्या वेळी हाच उपाय पटला असणे स्वाभाविक आहे. भावी काळात युगोस्लाव्हिया व अल्बानिया यांखेरीज इतर राष्ट्रे रशियाच्या वर्चस्वाखाली गेली व कम्युनिस्ट झाली. अल्बानिया व युगोस्लाव्हिया ही राष्ट्रे कम्युनिस्ट झाली, पण रशियाच्या वर्चस्वाखाली गेली नाहीत. रशियाने त्यांनाही गळफास घातला असता. पण ती पूर्व भूमध्य समुद्र किनारी राष्ट्रे असून त्यांवर रशियाचे वर्चस्व आल्यास पूर्व भूमध्य समुद्रात रशियाचे वर्चस्व आले असते व म्हणून पश्चिमी राष्ट्रांनी युगोस्लाव्हिया व अल्बानिया यांवर रशियाला वर्चस्व मिळवून दिले नसते; पण जर्मनीला पूर्व युरोपवर आक्रमण करण्याची बुद्धी होऊ नये म्हणूनच अमेरिकेने जर्मनीची फाळणीही पत्करून पूर्व जर्मनी कम्युनिस्ट होऊ दिला. पूर्व युरोपात पूर्व जर्मनी, पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, रूमानिया, बल्गेरिया, हंगेरी ही राष्ट्रे अशा प्रकारे रशियन वर्चस्वाखाली गेली व कम्युनिस्ट झाली. १९५६ साली हंगेरीतील कम्युनिस्ट पक्षात दुफळी होऊन एक गट रशिया–विरोधी झाला. तेव्हा रशियाने हंगेरीवर स्वारी करून रशिया विरोधी गटास चेचून काढले. गेल्या ऑगस्टमध्ये झेकोस्लोव्हाकियात अशीच दुफळी झाली तिची व्यवस्था रशियाने कशी लावली हे जगजाहीर आहे. पण याबाबतीत आपण हस्तक्षेप न करता आपण रशियाचा हा घरगुती प्रश्न आहे असे मानून तटस्थ राहू असे पश्चिमी राष्ट्रांनी ठरविले याचे कारण पूर्व युरोपीय राष्ट्रांचे लग्न रुझवेल्टने रशियाशी एकदाच लावून टाकले असल्याबद्दल सर्वांची खात्री आहे हे होय. झेक घटनेला प्राचीन रानवट माणूस व त्याची बायको यांचा दृष्टान्तवर दिला तो या अर्थाने.

## हंगेरी व झेक : तुलना

या प्रकरणात आणखीही खोल अर्थ आहे तो आता पाहू. हंगेरीवर व झेकोस्लोव्हाकियावर रशियाने बारा वर्षांच्या अंतराने जी आक्रमणे केली त्यांची कारणे सारखी नव्हती. हंगेरीत रशियावादी व रशियाविरोधी असे दोन गट माजून



अनुक्रमणिका

त्यांच्यात यादवीच सुरू झाली. पण झेकोस्लोव्हाकियात असे गट झाले तरी ते गट उघड नव्हते. तेथील रशियाविरोधी गट सशस्त्र लढत नव्हता तर राजवट पश्चिमी लोकशाहीसारखी करू पाहात होता. त्याचे तंत्र सूक्ष्म व प्रच्छन्न होते. युगोस्लाव्हिया व अल्बानिया ही राष्ट्रे रशियापासून स्वतंत्र आहेत तरी पण तेथे कम्युनिस्ट सत्ता आहे. कम्युनिस्टांखेरीज इतर पक्षांना अस्तित्व नाही, मतप्रदर्शन स्वातंत्र्य कम्युनिस्ट चौकटीबाहेर कोणासही नाही. रुमानिया हल्ली रशियन वर्चस्वापासून फुटल्यासारखा वागत आहे, पण त्यानेही कम्युनिस्ट सत्ता ढिलावू दिली नाही. कम्युनिस्टाखेरीज इतरांना मत प्रदर्शन-स्वातंत्र्य दिलेले नाही व कम्युनिस्टांनाही कम्युनिस्ट चौकटीबाहेर मतप्रदर्शन स्वातंत्र्य नाही. यामुळे मानीत राष्ट्रांची रशियाशी फटकून वागण्याची प्रवृत्ती जी आहे ती रशियाला आवडत नव्हती तरी रशियाने त्या राष्ट्रांना कह्यात आणण्यासाठी आक्रमण केले नाही. पण झेकोस्लोव्हाकियातील प्रकार वेगळा होता. तेथे रशिया-विरुद्ध बंड झाले नाही, रशियापासून फटकून वागण्याची प्रवृत्ती बळावतेसे दिसले नाही. तेथील सरकारने फक्त वृत्तपत्र नियंत्रण दूर सारण्याला सुरवात केली. कम्युनिस्ट पक्षाच्या सत्तेवर प्रखर हल्ले वृत्तपत्रांत उघडउघड होऊ लागले, लोकांना ते आवडू लागले व पश्चिमी राष्ट्रांतल्यासारखी अनेक पक्षांच्या स्वातंत्र्यावर आधारलेली पार्लमेंटरी लोकशाही झेकोस्लोव्हाकियात सुरू व्हावी अशी मागणी प्रचंड लोकमताच्या पाठिंब्याने होऊ लागली. यामुळे झेकोस्लोव्हाकियात ही चळवळ यशस्वी झाली तर तिचे लोण पूर्व जर्मनीत, इतर पूर्व युरोपीय राष्ट्रांत व अखेर रशियातही पोचून सर्व कम्युनिस्ट राष्ट्रांतील कम्युनिस्ट सत्ता कोसळून पडतील अशी रशियालाच नव्हे तर पूर्व जर्मनी, पोलंड, हंगेरी, बल्गेरिया या राष्ट्रांनाही भीती वाटली व त्यांनी संयुक्त बलाने झेकोस्लोव्हाकियावर झडप घातली.

पश्चिमी राष्ट्रांच्या लक्षात हे सारे तावडतोब आले व रशियाच्या या आक्रमणाला महत्त्व न देता रशियाला ज्या अर्थी मुलूखगिरी माजवायची नाही व आंतरराष्ट्रीय अशांतता मोडायची नाही त्या अर्थी रशियाच्या आक्रमणाची गय केली पाहिजे अशी भूमिका पश्चिमी राष्ट्रांनी घेतली. मला येथे रशियाच्या अथवा पश्चिमी राष्ट्रांच्या धोरणाचे समर्थन करायचे नाही. या साऱ्या ऐतिहासिक घटनांचा अर्थ काय एवढेच मी समजून सांगतो आहे. आजच्या जागतिक राजकारणात या झेक प्रकरणाला फार महत्त्व असून त्यात निराळचा राष्ट्रांच्या ज्या प्रवृत्ती दिसून आल्या त्यांचे परिणाम जगावर व भारतावर दीर्घकाल होणार आहेत. एक ठळक प्रवृत्ती-जी दोन्ही टोकांच्या गटात दिसली ती ही की दोघांनाही आता युद्ध नको आहे व शस्त्रास्त्रवर्धनाचा खर्चही वाढायला नको आहे. म्हणून वातावरण तापू द्यायचे नाही असा प्रयत्न दोन्हीकडूनही होतो आहे. जगातला सामर्थ्यतोलही बदलतो आहे. अरब इस्रायल लढयात इजिप्तचा पराभव झाला, पण त्याचा फायदा अँग्लो अमेरिकनांना मिळण्याऐवजी रशियाचे आरमारी वर्चस्व पूर्व भूमध्य समुद्रात वाढण्यात त्याचा परिणाम झाला. सुएझ पूर्व प्रदेशांतून ब्रिटनने सशस्त्र दले काढून घेण्याचे योजले आहे यामुळे आशियात जी पोकळी निर्माण होत आहे तीही रशियाला भरून काढावी लागणार आहे. व्हिएतनाममध्ये अमेरिकेची फार अब्रू गेल्यामुळे अमेरिकाही आशियात दुर्बळ होणार असून त्या मानाने रशियाचे आशियातील वर्चस्व वाढणार आहे. अमेरिकेत कट्टर कम्युनिझम विरोधी निक्सन राष्ट्रपती झाल्याने पूर्व युरोपीय कम्युनिस्ट राष्ट्रांशी स्नेहाने वागून त्यांना रशियापासून फोडण्याचे धोरण अमेरिका आता अवलंबणार नाही. सर्वच कम्युनिस्ट राष्ट्रांशी अमेरिका ताठयाने वागेल यामुळे त्यांची एकजूट होईल. पूर्व युरोपीय राष्ट्रात बंडे घडवून तेथील कम्युनिझम उलथून पाडण्याचे धोरण अमेरिकेने येत्या दहा वर्षांत सोडून दिले आहे. पश्चिमी पद्धतीच्या लोकशाहीचा सुरुंग लागून पूर्व युरोप व रशिया यातील कम्युनिस्ट सत्ता कोसळण्याचा संभव आता झेक प्रकरणानंतर कायमचा टळला. युरोपात व आशियात आता रशियाचे बळ वाढले असा सर्वांचा अर्थ आहे. पाकिस्तानला काश्मीर प्रश्न युनोत आणू देण्यास ब्रिटनचा पाठिंबा मिळणार नाही असे ब्रिटनने जाहीरपणे सांगितले असून अमेरिकेची भूमिका तीच असल्याची बातमी आहे. आणि याचे

(पृष्ठ ७४ वर पहा)

चंद्र आणि चंद्रबिंब




महाराष्ट्राला 'बेळगांव-कारवार'चे आश्वासन देणे चालूच आहे

## पूर्वकथासूत्र

चिंबावे हे कोकणातले एक खेडे; गावासारखेच एक गाव. तेथील ग्रामस्थांचे गट होते, आपसात प्रेम होते नि हेवेदावेही. तथापि सर्व व्यवहार सुरळीत चालायचे. काका वर्वे हा चिंबाव्याचाच एक ग्रामस्थ, मुंबईत नोकरीला होता; पण कोकणच्या अपार प्रेमानं ते चिंबाव्याला आले. परशुरामाच्या या भूमीला नकाशावर कायमचं मानाचं स्थान मिळावं ही त्यांच्या मनची इच्छा !

हे वर्वेकाका आपल्या भोवतालच्या काही लोकांच्या गटात पत्ते खेळत, चर्चा करीत, गप्पा गोष्टी करीत. त्यात एक मुसलमान शिक्षकही होता. त्यालाही ते बरोबरीनं वागवीत. एके दिवशी एका ब्राम्हण स्त्रीची गाय हरवली, ती कुणातरी मुसलमानानं नक्की कापलीच असली पाहिजे असा निर्णय वर्वेकाकांच्या गटानं ठरविला आणि मुसलमानांना चांगलीच अद्दल घडविली पाहिजे हे महंमद मास्तरच्या उपस्थितीतच ठरलं.

महंमद मास्तराकडनं मोहल्ल्यातील मुसलमानांना ही गोष्ट कळली. आपल्याबद्दल गावातल्या हिंदूंना संशय येत आहे हेही त्यांच्या ध्यानी आलं आणि बदल्याची भाषा सुरू झाली. महंमद मास्तराला तेही मानवलं नाही. त्यांनी आपल्या नेहमीच्या बैठकीतल्या वर्वे काकांची गाठ घेतली आणि हे प्रकरण आपसात मिटविण्यासाठी मुसलमान मंडळी आपसात वर्गणी काढून गाईची किंमत देण्यास तयार आहेत असं बोलणं सुरू केलं. पण वर्वे काकांनी आणि बैठकीतल्या इतरांनी महंमद मास्तरची तडजोड फेटाळून लावली आणि पुढे ?

[ कादंबरीचा तिसरा आणि शेवटचा भाग पुढील अंकी प्रसिद्ध होईल — संपादक ]




—रवींद्र पिंगे

[७]

चुरगळलेल्या केशरी मुकटाचा शेव सांभाळीत हरिश्चंद्रकर वकीलानी ताम्हणातलं संध्येचं पाणी अंगणातल्या तुळशीवृन्दावनाला दाखवलं आणि मग रिकामं ताम्हण पडवीतल्या टेबलावर ठेवून ते काकाना म्हणाले,

**" दिवसाची सुरुवात अशी धार्मिक कृत्यानी झाली, म्हणजे मग उरलेला दिवस शांत चित्ताने घालवता येतो. बरं, काकासाहेब, आज सकाळचे कसे तुम्ही ? "**

" सगळं सविस्तर सांगतो——पण अगोदर तुम्ही सोवळं तर सोडून ठेवा. तशी काही घाई नाही मला."

" आपण आपले मुद्याचे बोलू या ! त्यात सोवळे आड यायचे कारण नाही.

" नाही, तुम्हालाच मोकळं वाटावं म्हणून म्हटलं मी."

" ते आलं लक्षात. बोला, काय काम काढलंय ?"

" बाबीशेट तुळसकरानी आग्रहच धरला की हरिश्चंद्रकराना भेटा. म्हणून निघालो."

" बाबीशेट कां नाही आले ? इथले एजंट टणाणा करताहेत त्यांच्या नावाने वर्षभर !"

" खरं की काय ?"

" गनीशेटच्या गुमास्त्यालाच विचारा. तो सगळं सांगेल. गुदस्तांच्या पावटयांचे पैसे बाबीशेट अजून देतोय ! तुम्ही आपल्यातले म्हणून सांगतो, ह्या वाण्यांवर विश्वास ठेवू नका. तीन देतील नि तेहतीस मांडून ठेवतील. नि तेहतीसांचं देणं असलं, तर ते फेडण्यात तीन वर्षं ढकलतील ! बाबीशेटला सरळ माणूस समजू नका तुम्ही—— हिटलरचा काका आहे तो सोद्या ! बरं, काम काय काढलत ?"

" आपल्या ताई देवधरणीची गायलीच गायब झाली !"

बाबीशेटचा गोठा तपासलात ?"

" काय बोलणं हे !"

" अहो, वाणी हाय तो ! दुसऱ्याचं गुरू आपल्या गोठ्यात लपवायला कमी नाही करणार तो !"

' वरं, आम्ही तपासला. मग तर झालं ?"

" पुढे.

"त्या गायलीची सफरीवाल्यानी सागुती केलीनी."

" पुरावा ?"

" ती कुठे असल्याचा पुरावा नाही. त्या अर्थी हे अघोर कर्म सफरीवाल्यांचेच."

" म्हणजे नकारात्मक पुरावा आहे म्हणायचा."

" हवा तितका आहे."

" ताई काय म्हणते ?"

" ब्राम्हण बाई ती. ती काय म्हणणार ?"

" हा पुढाकार तुमच्या गळ्यात कुणी अडकवला ? तिने?"

" हे धर्माचं काम. म्हटलं तर प्रत्येकाच्या गळ्यात आहे."

" पण तो वाणी नामानिराळा राहील ! बघाल."

" छ्या ! कोर्ट झुंजवायचं ही मुळात त्यांचीच कल्पना."

" माझं नाव कुणी सांगितलं ?"

' त्यानीच ! तुमच्या तातबांचा नि त्यांचा पांच पिढयांचा संबंध."










"होय ना ? पण ह्या वाण्याने तातवांच्या नावावरसुद्धा सहाचे सासष्ट केले -- पुढे आम्ही ते सवाई-दिढीने फेडले हा भाग निराळा."

"पण तो भाग तुमचा आपसातला आहे. मी उभा आहे ह्या धर्माच्या नावाने."

"चांगली गोष्ट आहे. पुण्याचे धनी तुम्हीच व्हाल."

"मला आशीर्वाद नकोत. कायदेशीर मदत हव्याय."

'काही तरी एक मिळेल; भोंगळ आशीर्वाद किंवा काटेकोर सल्ला ! दोन्ही गडध्यांवर पाय ठेवू नका."

"तूर्तास मला कायदेशीर सल्ला हवा."

मी वकील आहे."

"एरव्ही मी इकडे कशास वळलो असतो ? ब्राम्हणांची घर काय कमी आहेत ?"

"मी अर्जाचे दहा, नि काम चालवण्याचे वीस घेतो."

"म्हणजे तीस झाले."

"झाले."

"धर्माच्या कामाला सुद्धा ?"

"माझा चरितार्थ चालणे नि ह्या राजापुरात कचेरीजवळ हरिश्चंद्रकरवकीलाची पाटी कायमची दिसणे, ह्या दोन गोष्टी त्यापेक्षाही अगत्याच्या आहेत. आणि असे जर आहे, तर फीच्या बाबतीत मी पडतं घेता कामा नये. खरं का खोटं ?"

"आम्ही म्हटलं धर्माच्या इभ्रतीचा प्रश्न आहे. तेव्हा-"

"कोर्टात प्रश्न धर्माच्या इभ्रतीचा नाही; कायदेबाजीचा आहे. आणि काय हो काका, धर्माच्या इभ्रतीचा जर प्रश्न आहे तर चिंबाव्याच्या विष्णु भटाला कां नाही काळा कोट घालून कोर्टात उभ करत ? कारण, प्रश्न धर्माचा नाही, कायद्याचा आहे !"

"गाववाले खेटरं मारतील मला."

"मग तुम्ही आपले विष्णु भटाला उभं करा नि मुंडावळ्या बांधून घ्या !"

"मला काय वाटलं ते स्पष्टपणे सांगितलं."

"मी तरी दुसरं काय केलंय ?"

"आत्ता किती द्यावे लागतील ?"

"एक रकमी तीस."

"रकमेत सूट नाही मिळणार म्हणता ?'

"एकदा सांगितलं ते ब्रम्हवाक्य. न पटल्यास दुसऱ्या वकीलांची दार मोकळी आहेत."

"तसं असतं तर तुमच्याकडे आलोच नसतो मुद्दलात."

"मग तीस रुपये मोजा."

"मोजले !"

"मोजले नव्हे; चक्क मोजा !"

हरिश्चद्रकरवकील हटत नाहीत हे नक्की झाल्यावर काकानी पाचांच्या सहा नोटा पुढे केल्या.

"ह्याच्यात टाका." वकीलानी ताम्हण पुढे करून सांगितले. नोटा पडलेले ताम्हण मग मुकटयाचा शेव सांभाळीत वकीलानी आत नेऊन संध्येच्या पाटावर ठेवले. मुकटा बदलून धोतर नेसलेले

हरिश्चंद्रकर मग दोन कप बाहेर घेऊन आले. दुधाचा कप त्यांनी आपल्याकडे ठेवला. चहाचं पाणी काकांना दिलं.

"आता असं करा काका, अगोदर पोलीसात जाऊन गाय हरवल्याची तक्रार ताई देवधरणीच्या मार्फत गुदरा. हे दावं स्वतःच्या गळचात अडकवून घेऊ नका."

"पोलीसांचं लफडं नको बुवा."

"नको कसं ? फक्त तोच मार्ग आहे. अगोदर तक्रार गुदरा. कोर्ट कचेरी हे नंतरचे पर्व."

"म्हणजे हे लांगडं होणार हो !

"तुमचा हेतू काय आहे, की यवनांचा आवाज बंद व्हावा. हो की नाही ? "

"अर्थातच."

"मग त्यासाठी अगोदर फौजदाराचा हंटर कडाडला पाहिजे. म्हणजे नंतर सर्व काही सुतासारखं सरळ येणार. हिटलर एवढा कशाने चेकाळलाय ? कारण त्याच्या हातात शस्त्र आहे. तेव्हा, तुमच्यातर्फे फौजदाराला हातात शस्त्र घेऊ दे. असं झालं आणि सगळा मोहल्ला तुमच्या दारात नाकं घासटत नाही आला, तर ह्या कम्पौंडाला हरिश्चंद्रकर वकीलाची पाटी दिसणार नाही !"

पोलीस ठाण्याकडे जाताना काकांना वाटत होतं की आपल्या देहात कुणी तरी तापवलेलं शिसंच ओततंय.

[ ८ ]

हेगिष्टे फौजदाराचं नुसतं नाव काढलं तरी उभ्या तालुक्याचा थरकाप होई. पाच हजार मैलांवरून राजा राज्य चालवत होता, त्याचं श्रेय ज्या फडर्या माणसांच्या कार्यक्षमतेला दिलं जात होतं, त्यात हेगिष्टे फौजदाराची गणना जरूरी केली जायची. मुंबईतल्या दंगलीचं लोण कोकणापर्यंत पोहोचलं नाही ह्याचं श्रेय दोन्ही जमातींच्या डरपोकपणाकडे जेवढं जातं, त्याच्यापेक्षा अधिक मापाने ते हेगिष्टे फौजदाराकडे जातं. माणसाची कीर्त असावी तर अशी !

आणि अशा पावरवाज अंमलदाराचे पाय चिवाव्याला लागले! बाबीशेट सकाळपासून जातीनं हवं-नको पाहू लागले. बैठकीचा कानोसा घेऊ लागले.



"अरे, कोंबडं शिजतंय ना सीताराम ? नि काय रे एकनाथा, अरे ते भैरव पाखाडीतलं मडकं रे केव्हा येणार ? निदान येईल हे तरी नक्की ना ?

"साहेबाना तळलेली कालवं फार आवडतात शेट."

"त्याचाही बंदोबस्त केलाय साहेब."

"आणि कोलंबीचं सुकं ?"

"राणेसाहेब, बाबीशेटकडे एकदा एखादी गोष्ट सोपवलीत ना, की तुम्ही अगदी उशीखाली हात घालून ढाराढूर झोपायचं."

"तुम्हाला सुचवायचं काम केलंच पाहिजे हो. नाही तर गाठ साहेबांशी आहे—नुसती हाक मारली तर वरचे खाली कोसळतील !"

"बंदोबस्त रेसभर कमी पडला तरी नंतर सांगा. नाव कशाला हवं ?" बाबीशेटानी निश्चयपूर्वक सांगितलं.

"राणे. फौजदाराची हाक कानावर पडता क्षणीच राणे धडपडत बाहेर जाऊन उभा राहीला.

"राणे, बाबीशेटना बोलाव. काकानासुद्धा बोलाव."

दोघे फौजदारासमोर हजर झाले.

"तुमचा संशय कुणावर आहे ?"

"खास असा कुणावरच नाही.

"मग खाटचाने कामाला सुरवात कशी करायची ?"

"तेही खरंच."

"चटदिशी नाव सांगा. आम्हाला कामं संपवून परत माघारी वळायचंय."

"आम्हाला सफरीवाल्यांचा संशय येतो."

"गावात सध्या किती सफरीवाले आहेत ?"

"एक-दोन येऊन जाऊन असतात."

"त्यांची काय तोंडं लागल्यायत् अख्खी गाय पचवायची !"

"आपण तरी काय सांगणार ?"

"तक्रार करू नका म्हणून विनवणी कुणी-कुणी केली ?"

"महंमद मास्तर तांब्यानी."

"म्हणजे तोच गायचोर आहे."

"छे-छे ! एक तर तो मास्तर-माणूस. शिवाय आमच्या बैठकीतला."

"बैठकीतले चोऱ्या करीत नाहीत ? किती जणाना हजर करू ? परवा परसोद्याला कृष्णा न्हाव्याचा वस्तरा चोरीला गेला. कुणी चोरला? सफरीवाल्यानी?—चक्क न्हाव्याच्या बैठकीतल्या विश्राम गुरवाने ! आता बोला !"

"असेल."

"असेल नव्हे, आहेच."

"पण महंमद मास्तर त्यातले नाहीत. हाडाचा गरीब माणूस आहे. आमच्या गणपतीसमोर ताशे वाजवायला बोलवलं तरी नाही म्हणणार नाही, असा लोभी."

"हा लोभच नडतो एखाद वेळी."

"साहेब ते सगळं खरं, पण मास्तरांचं नाव घेऊ नका. उलट,






कज्जा करू नका, वाटल्यास गायत्रीची किंमत मोजतो असं सांगायला तेच स्वतः आलेवते."

" ह्याचा अर्थ तो मास्तर टरकलावता ! कृष्णा न्हाव्याचा वस्तरा चोरीला गेला तेव्हा कोणी कां नाही पुढे आला सांगायला की वावा, आम्ही टाकतो वस्तऱ्याचे पैसे, पण सरकारात जाऊ नका ?"

" महंमद मास्तरांचा अनुभव उत्तम आहे आमचा. वॉर फंडालाही त्यानी पाच रुपये दिले."

"चोरीचा पैसा असल्यावर पाच काय नि पंचवीस काय, सारखेच."

"आम्हाला आपला सफरीवाल्यांचाच संशय येतो."

"छ्या–सफरीवाले असली कामं नाही करीत. ते कॅमेरे चोरतात."

"नवलच आहे."

"काही नवल नाही पोलीसखात्याला. दरोडे हुडकून काढतो आम्ही, भटणीची गाय म्हणजे किस झाड की पत्ती !"

"तुम्ही गायत्रीचा वध करणाऱ्याना हुडकून काढणार हे तर नक्कीच. फक्त महंमद मास्तरांना त्यात गोवू नका इतकंच आमचं सांगणं सरकारपुढे."

"आता तुम्ही गप् रहा–त्यातलं काही कळत नाही तुम्हाला. असल्या हजारानी केसीस चालवल्यायत आम्ही." हेगिष्टे फौजदारानी निक्षून सांगितलं आणि राणे हवालदाराला फर्मावलं, "अरे, त्या महंमद मास्तरला घेऊन ये. असेल तिथून आण–हात हलवीत येता कामा नये. लक्षात ठेव."

तुळसकरांच्या पडवीवरले सगळे चेहेरे खर्कन् उतरले. काकानी बाबीशेटना खुणावून माजघरात बोलावून घेतलं.

"प्रकार भलताच चाललाय !"

"तरी मी सांगत होतो की साहेबासमोर आल्यावरोबर ग्लासं मांडू नका म्हणून."

"एक मडकं पोटात ओतलान् म्हणे !"

"आणि आणखी एक मागवलन् आहे !"

"मरण आहे !

"सर्वात अधिक मरण आहे महंमद मास्तरांचं. हा राक्षस त्यांचं सालटं सोसायला कमी नाही करायचा."

"आपण केस काढून घेऊया. म्हणजे प्रश्नच मिटला."

"पण ह्या खविसाने ऐकलन् पाहीजे ना ?"

"तेही खरंच. कुठली दुर्बुद्धी झाली नि–"

"झालं ते झालं. पुढचा रस्ता सुचतोय का ? तर बोला."

माजघरातल्या काळोखात सगळयानी डोकी चालवून पाहिली. त्यात अर्धा तास गेला.

राणे हवालदार महंमद मास्तराना हाताला धरून घेऊन आला. मास्तरांचं तोंड चिमणीसारखं झालं होतं. मास्तर पडवीतल्या खांबाला टेकून बसले. त्याला पाहून फौजदार किंचाळला,

"बापाची पेंड काय रे पडवी म्हणजे ? जा, त्या झाडाच्या खाली उभा रहा."

ज्या पडवीवर मास्तर विजिकला सन्मानानं बसत त्या पडवीवरून ते उठले आणि शांतपणे परसवानल्या निंबाच्या छायेत गप्प उभे राहीले.

"तू काय करतोस ?"

"मुलां पढवतो."

"नि तरीसुद्धा हे असले धंदे करतोस ?"

"मी गाय कशाला कापीन साहेब ? हे तुळसकरांचां घर आम्हाला अमच्या घरासारखांच आहे साहेब.

"तुम्ही लोक असं बोलता नि भुरळ पाडता. आणि मग हे हिंदु लोक फसतात; आता फसल्यायत तसे."

"ह्या प्रकर्नासी आपला काय पन संबंध नाय साहेब.

"सरकारात जाऊ नका, पैसे देतो गाईचे, असं कोण म्हणालंवतं ?"

"मीच बोललांव साहेब."

"गाय न पचवता तू पैसे देणार होतास ? साधा मास्तर तू ! नि तू शंभर रुपये मोजणार होतास फुकटंफाकटी? काय तोंडं लागल्यायत तुमची ! म्हणे पैसे देईन–पैसे म्हणजे चिचोके वाटले काय रे ?

' मोअल्ल्येवर पट्टी वसवणार होतो साहेब. मी एकटा कुठले देणार साहेब ?"

"हेच मला तुझ्या तोंडून पाहीजे होतं ! तू गाय कापलीस नि मोहल्ल्यातल्या सगळयानी सागुती खाल्ल्ली, हे उघड झालं. एरव्ही पैसे भरायला सर्व मोहल्लेवाल्यांना काय वेड लागलंय ?"

"साहेब, माझा खरोखरच संबंध नाही ह्या प्रकर्नासी.

"तोंड–वंद कर म्हणतोय ना फौजदारानं सर्व बळ एकवटून दरडावलं. त्या आवाजानं झाडावरची पाखरं पळाली.

मास्तरांचं तोंडच सुकलं. ते जागच्या जागी गुडघ्यात मान घालून वसले. एव्हाना मोहल्ल्यातली माणसं तुळसकरांच्या अंगणात जमली होती. त्याना पांगवण्याचा प्रयत्न राणे हवालदाराने केला, तशी ती माणसं लांबच्या झाडाखाली तोंडं उघडी टाकून उभी राहिली.

**एकेकाचा चंद्र !**




**स. का. रामाचा 'चंद्रा'साठी हट्ट !**








फौजदाराने राणे हवालदाराच्या कानात सांगितलं,

"अबुबकरशेटकडून पन्नास रुपये आण माझं नाव सांगून. चल, पळ."

राणे हवालदार उन्हातून घामाघूम होऊन अबुबकरच्या वाडीत गेला. अबुबकरशेट समोर मडकं आणि ग्लासं घेऊन बसला होता. त्याला कुर्निसात करून राणे म्हणाला,

"साहेबानी पाठवलंय शेट."

"क्या बात है ?"

"फौजदार म्हणतात त्याना पाऊणशे रुपये हव्यायत्."

"पण भटनीच्या गायीशी अमचा संबंध काय ? निसकारन छलनूक है ही अमचे लोकांची. मुसलेमान झायले म्हंजे काय असां करतात ?"

"नाही तर फौजदार तुम्हाला पण खेचतील राजापुरात !"

"किती हव्यायत त्याना ?"

"पाऊणशे."

"म्हंजे अमची मैन्याची मिलकत झाली."

"त्याला मी काय करनार ? नोकरमाणूस आपण."

"थांबा. अबुबकरशेट घरात पैसे आणायला गेला नि सहा नोटा घेऊन परत आला.

"आता फकत् साठ गावले. घे."

"चालेल. सांगतो मी त्याना."

"ज्यास्त नायतच तर देऊ कुठूनशान ?"

"ऐकतील फौजदार. तसे चांगले आहेत ते."

दहा दहाच्या सहा नोटा घेऊन राणे निसटला. अर्ध्या वाटेवर आल्यावर त्याने त्यातल्या तीन नोटा आपल्या टोपीच्या आतल्या कप्प्यात लपवून ठेवल्या. उरलेल्या तीन नोटा पॅन्टेच्या खिशात ठेवल्या. मग धावत धावत घामाघूम होऊन तो फौजदारासमोर हजर झाला.

"काय झालं ?" फौजदाराने विचारलं.

"शेटकडे फक्त तीस रुपये होते. ते आणले. म्हणाला, ज्यास्त नायतच तर देऊ कुठूनशान ?"

"खरं बोलतोस ?"



"हे वाक्य त्यानं म्हटलं नसेल तर मी दोन बापांचा !"

"ठीक आहे. दे ती वस्तू."

दहाच्या तीन नोटा राणेने फौजदाराच्या हातावर टेकल्या. फौजदाराची कळी खुळली. मोठ्या डौलाने जेवण सुरू झालं. कोंबडी संपली. कालवं संपली. ग्लासं रिकामी झाली. तब्बल तीन ढेकर दिल्यावर फौजदार जागेवरून हलला.

परसवातल्या झाडाखाली बसून महंमद मास्तर तो खेळ पहात होते. जिथे आपण हक्काने कॉफी मागत होतो, तिथे आपल्याला उपाशी उन्हात बसून रहावं लागावं, हा विचार ते पुन्हा पुन्हा उगळत होते.

उन्हं उतरेपर्यंत फौजदाराने पडवीतल्या आरामखुर्चीत बसून वेळ काढला. राणे पडवीतल्या खांबाला टेकून उभा राहीला. मास्तर परसवातच झाडाखाली बसले होते. जीव मुठीत घेऊन इतर मंडळी माजघरात बसली होती.

"चला, निघायचं." फौजदार म्हणाले.

सुटकेचा श्वास टाकून मास्तरानी परसवातूनच नमस्कार केला. तेव्हा फौजदार दरडावला,

"तुला काय वाटलं, तू सुटलास ? निमूटपणी माझ्या मागून राजापूरला चल !"

मास्तराना धरणी दुभंगेल तर बरं असं वाटलं. मान खाली घालून पार्टीबरोबर निघायला ते तयार झाले.

इतक्यात लुंगी गुंडाळून अबुबकरशेट हजर झाला आणि मास्तराना म्हणाला,

"मास्तरानु, तुमी कसली पन कालजी करूं नगा. मी सगला बंदोबस्त करतांव ! अल्ला सर्वांची खुषी करनार !"

मास्तराना तेवढाच दिलासा मिळाला. अल्लाच्या नावाने मिळालेल्या दिलाशाच्या बळावर पोलीस पार्टीच्या मागून उपाशी मास्तर बापूंची घाटी चढू लागले. पावला पावलाने राजापूर जवळ जवळ येऊ लागलं.

अंधार पडू लागला. दिशा काळवंडल्या. चांदण्या दिसू लागल्या. तुळसकरांच्या पडवीवर कंदील लागला.

झाल्या प्रकारानंतर काका घरी गेलेच नव्हते. ते आरामखुर्चीत पडून राहीले. बाबीशेटने दुकान दुपारनंतर उघडलंच नाही. सर्वजण विषण्ण मनानं दुःख रवंथ करीत होते. काका म्हणाले,

"तरी मी सुरवातीपासून म्हणत होतो की पोलीसांचं लचांड मागे लावून घेऊया नको. पण माझं कोण ऐकतो ?"

"ठीक आहे. तुमची पायतणं घ्या नि मारा माझ्या तोंडात ! मग तरी समाधान होईल की नाही तुमचं ?"

"सुक्याबरोबर ओलं कसं जळतं ते सांगायचंय मला. खेटरं खाऊन दोष सुटते, तर प्रथम मी माझं तोंड फोडून घेतलं असतं. नाही त्या गोष्टी हव्यायतच कशाला ?"

"इथे सुक्याबरोबर ओलं जळलेलं नाही. नुसतं ओलंच जळतयं."








"दाम करी काम ! तुम्ही दोनशे घेऊन जा उद्या राजापुरास. सर्वांना चारा नि मास्तरला सोडवा."

"असं म्हणता ?"

बावीशेट पडवीवर फेऱ्या मारू लागले. घरात कुणीच कुणाशी बोलत नव्हतं. फक्त सैंपाकघरात चूल फुंकल्याचा आवाज येत होता.

बावीशेटचा नातू मंजिनाथ अंगाऱ्याची डबी घेऊन पडवीत आला.

"आजोबा, अंगारा."

"सर्वांच्या लावलास ?"

"लावला."

"रामरक्षा म्हटलीस ?"

"म्हटली."

"मग ऐकू नाही आली ती ?"

"मी मागच्या दारी विहिरीच्या कट्ट्यावर बसून म्हटली."

"वेडचा, रामरक्षा देवाजवळ बसून म्हणायची असते. तिकडे विहिरीजवळ कुठे गेलास काळोखाचा ?"

"घरात भीती वाटते."

"काय रे तुम्ही पोरं पण ! घरात भीती कसली आल्याय ?"

"दुपारपासून घरात भीती वाटायला लागल्याय."

"हे बघ मंजि, हा आपल्या देवाचा अंगारा आहे ना ?"

"आहे."

"तो लावला की भीतीबिती काही रहात नाही."

"खाली वाका. लावतो तुम्हाला."

"लाव; शाब्बास, नि पानं मांडली की सांगायला ये. आज रात्री मी तुला माझ्याजवळ झोपवीन हं मंजि."

आश्वासन मिळाल्याबरोबर मंजि उडचा मारीत आत गेला. पडवीवर कंदीलाच्या प्रकाशात काका आणि बावीशेट बसून राहीले.

अशीच पाच दहा मिनिटं गप्प गप्प गेल्यावर भीमी भक्तीण हातात चूड घेऊन तुळसकरांच्या परसवात दाखल झाली. काकानी विचारलं,

"काय गे, रातचे काय काढलेंस ?"

"ताईन् निरोप पाठवलान् तिची वेणू गाय आत्ता दिवेलागणीस घरी परत आयली !"

"अग, काय म्हणतेस काय ?"

"खरांच सांगते. भटनीची गाय परत आयली हां. रस्तो चुकलीवती म्हणतां."

निरोप ऐकून काकानी कपाळाला हात लावला. तुळकसरांचं घर निःशब्द झालं !

☆ ☆

[ ९ ]

सिंगापुरी माडांच्या बागेमुळे अबुबकरशेटच्या वैभवाचं कौतुक कर्दिले मोहल्ल्यात सर्वानाच वाटायचं. पोटावारी आगरं शिपण्यात ज्याची उमेदवारी खर्च झाली, त्यानेच प्रयत्नांना अक्कलहुशारीची जोड देऊन बागाईतदारांच्या मांडीला मांडी लावून दाखवावी ही कोकणातल्या गावात केवळ बहाद्दुरीच होती. अबुबकरशेटचं कर्तृत्व सर्वांना मान्य होतं. पण त्याहीपेक्षा त्याला धर्माची जी चाड होती, त्यामुळे मोहल्ल्यातल्या प्रत्येकाचा त्याला नम्र सलाम होता. मोहरमला सर्वांत मोठा आकडा त्याचाच असे. फतेअलीचे अकरा पडले, तर इस्फाकखानचे पंचवीस ठरलेले असत. ते दोन आकडे पाहीले की अबुबकरशेट डोळे झाकून पन्नासाचा आकडा घाली आणि दहा दहाच्या पाच नोटा तिथल्या तिथे मोजी. एवढा मोठा बागाईतदार; वर्षाकाठी दहा दहा हजारांची उलाढाल करणारा; घरी चार चार नोकर खपत. पण धर्माची बात म्हटली की वेलीसारखा नरम येई. रोझा म्हणजे सख्त रोझा. थेंबभर पाणी घेत नसे. एरव्ही बैठकीला गॅलनभर ताडी बसल्याबसल्या पचवेल ! तो कट्टर नमाजी होता हे त्याच्या भालप्रदेशावरचा काळा चट्टा आवर्जून सांगे. अशा धर्मनिष्ठ सधन माणसानं पोपईच्या पार्टीचं स्वतः होऊन दिलेलं आमंत्रण कोण नाकारणार?

माडांच्या सावल्या लांब झाल्याचं पाहून बागेत माणसं जमू लागली. सगळेजण जमिनीवर अंथरलेल्या जाजमावर बसले. जुन्या पत्र्याच्या खुर्चीवर महंमदमास्तर तांबे बसले. अबुबकरने पोपईच्या पहिल्या दोन केशरी खापा बशीतून मास्तरांच्यापुढे ठेवल्या. जमलेल्या प्रत्येकाला त्याने स्वतःच्या हाताने एक एक खाप दिली. नंतर जाहीर केलं,

"हे सगळं अमचे मास्तरची मोहब्बतसाठी हो ! मंद स्मित करून मास्तरानी बहुमान स्वीकारला. त्यासरशी धीर येऊन अबुबकर म्हणाला,

"दोन दिसांपूर्वी काय परकार झायला, ते अपलेपैकी समदेना मालूम है. मास्तर म्हंजे शरीफ आदमी. समदेको पढानेवाला. पन तेनापन पोलीसकोठडी मिळली. त्येंचा तकदीर सलामत म्हणून ते

**एकेकाचा चंद्र !**



अमेरिकन 'चंद्र' अजून कसा उगवत नाही ?



अनुक्रमणिका

आयलेत, नायतर मरन होतां. हे सगलां कारस्थान कुणी केलां ? नारायन पाखाडीवालेनी !"

जमलेल्याना ते एकदम पटलं. त्यानी माना डोलावल्या. त्यामुळे जोर चढून अवुबकरने सवाल पेश केला,

"आनि त्येंचा अपुन काय पन वदला घेनार नाय ? नाय-नाय; असां नाय होनार. माझा सवाल हाय मास्तरला के अजून पन त्येंचा इस्वास हाय त्या मंडलीवर ?"

मास्तरांनी पोपईची खाप खात खात मानेने नकार सुचित केला.

"तेच माझां म्हननां. हे लोक कवापन मानेवरून सुरी फिरवतील खातरी नाय."

आपुन पाखाडीवालेंशी संमंध ठेवयाच नुको म्हनजे प्रश्न सुटलांव ! अपली दुकानां वेगली, शाला वेगली, रस्ते वेगले, असां वेगलां वेगलां मामला केला के काम झालां." सुलेमान दालदीने आपले मत मांडले.

"असा कसा?" मास्तर आश्चर्याने उद्‌गारले, "अपुन वेगलां राहून काय करनार ? आपला नाय दुकान, का नाय एक ठिकान."

"पन अपले मुसलेमान लोकाना वेगला गाव पायजे. म्हजे ते गावात अपुन अपले नवाब." अवुबकर म्हणाला.

"जलले अमचे छोकरे ! हे नवाबी काय करनार ? दोन कुडेव भात मिलताना मारामार त्यांची. ते वेगले होऊन काय करनार ? तुमचां अपलां वरां हाय. नारल परसपर मुंबैला विकले के तुमी सुटले. अमचे छोकरे मेले भुके मरतील !"

"कसे मरतील ? अवुबकर जिंदा असताना कोन नाय मरनार, माझां ऐका. अपुन सगल्या पाखाडीवाल्यान्‌ला हकलून दिलां पायजे."

"अवुबकरशेट, तुमचां ठीक हाय. पन ब्रिटीशचां राज्य हाय नि तशात हिटलेरचा जोर हाय. तवां डी. एस. पी. जाम करेल काय कुनी केलां तर." मास्तर म्हणाले.

"ते सगला वंदोवस्त मी करतांव. काय झालांव तर जिम्मेदारी माजी; कुनाला कसली तकलीफ नाय. उलेमाला बोलूया हवां तर.

"उलेमाचा संमंध काय ?"

"कसा नाय ? मुसलेमानची हरएक गोष्ट उलेमाचे हुकूम परमाने झायली पायजे. अने नाय झायली तर इस्लामचे खिलाफ काम होनार !"

"समजा अपुन वेगलां गाव मागितलांव, ने तो अमला मिलाला, तर इथे अपुन काय करनार ? अपली शाला पर नाय. फुरुसवाल्यानी कैसी अच्छी उर्दू शाला काढलीव."

"मग मी काय सांगतांव दुसरां ? अपुन गाव घेतला वेगला के अपली उर्दू शाला पन होनार."

"उर्दू शिकलेला नोकरी कोन देनार ? मराठीच वरी. अगदीच नायसां झाला तर निदान तलाठी होईल.

"बगा कुनाला इस्लाम नकु; नोकरी हवी ! पाखाडीवाल्येनी पोलीस केला. तरी पन इस्लाम नकु ! थू :"

"ते मातर भलतांच झालां. माल कुनाचा, पोलीस बुलावतो कोनाला, पकरतात कुनाला, धींड कुनाची कारतात, ने माल परत कुनाला मिलतो !"

"आनि वरती माफी मांगतील तर हराम ! हे असलेंचे बरोबर अमी कसासाठी ऱ्हानार ?"

"इतकां वर्सां ऱ्हायलो नाय ?"

"अतां मास्तरच असां बोलतांव म्हंजे अमी काय बोलनार ?"

"अमी अपले कायच बोलत नाय ! झालां मनासारखां ?"

"मी म्हनतु मास्तरनं इतकां केलां तरी लै झालां. नारायन पाखाडीवाले आनि भैरव पाखाडीवालेना हकून लावना आमचा काम; मी जिम्मेदार है. वखत परली तर हज्जार रुपये उभे करनार, पन सगलेना पलवनार !"

"पोलीसचा लफरा हुनार नसेल तर अवुशेटचे मागे सगले मुसलेमान उभे ऱ्हानार." सुलेमानने पुष्टी दिली.

एवढा पाठिंवा अवुवकरला पुरे होता. मनातल्या मनात धर्माचं हिरवं निशाण त्याने आपल्या खांद्यावर टाकलं आणि दूर पहात तो ताठ उभा राहिला.

पोपई खायाला आलेल्या सर्वांना तो आकाशाएवढा प्रचंड वाटला. आणि त्याच्या त्या श्रद्धायुक्त आवेशामुळे पल्याच्या खुर्चीवर चिमणीसारखं तोंड करून वसलेले महंमद मास्तर वावडीतल्या वेडकासारखे किरकोळ वाटले.

☆ ☆

## [ १० ]

आकाशात मळभ दाटून आलं होतं. हाशहुश् करीत धूसर सूर्यप्रकाशात काका वापूंची घाटी चढू लागले. सूर्य अस्ताला जात होता. वडापिंपळाच्या पानात अस्तास टेकणाऱ्या सूर्याच्या सौम्य किरणांचे लोलक सळसळत होते. गडाच्या अंगाचे डोंगर अस्पष्ट दिसू लागले. काळोख लवकर होणारसं दिसू लागलं. कट्टयापर्यंत जायचं तर काळोख झाला असता; ठार काळोखातून उतरावं लागलं असतं. तशात रात्र चांदणी नव्हती. हे सगळं गणित हेरून वापूनी वेळीच परतायचं ठरवलं. अर्ध्यावरूनच ते घाटीची फरशी झपाझप उतरू लागले.

समोरून घाटी चढून येत असलेला अवुवकरशेट पाहून काकाना आश्चर्य वाटलं. कारण तो ह्या मार्गाने आणि निदान ह्या वेळी तरी कधीच येत नसे. राजापुराला नारळांच्या खरेदी-विक्रीचं काही खेकट निघालंच, तर त्याची नोकरमाणसं वापूंची घाटी तुडवून पार होत. अवुबकर वागेत मडकं घेऊन बसायला मोकळा राही. मग ही स्वारी आज इकडे कुठे फिरकली ? फार विचार करीपर्यंत तो काकांच्या समोर येऊन ठाकला.

"अरे काय शेटलोक, तुम्ही आज ह्या वाजूला कसे काय बुवा? काकानी नसलेली जवळीक दाखवीत विचारलं."

(पृष्ठ ४९ वर पहा)






# फॉस्फोमिन -



अधिक उत्साह देते.



भूक वाढविते. जोम वृद्धिंगत करते.



शरीराची रोग-प्रतिकार-क्षमता वाढविते

खरोखर!...

फॉस्फोमिन म्हणजे घरकुलांतील आरोग्याचे कारंजे!




व्हिटॅमिन बी कॉम्प्लेक्स आणि विविध ग्लिसरोफॉस्फेटस्‌युक्त उत्तम फलास्वाद असलेले हिरव्या रंगाचें टॉनिक—फॉस्फोमिन

**SQUIBB®**

® हा ई. आर. स्क्विब अॅण्ड सन्स, इन्कॉर्पोरेटेड, यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे व करमचन्द प्रेमचन्द प्रायवेट लि. यांना तो वापरण्याचे लायसन्स आहे

SARABHAI CHEMICALS

Shilpi SC 50 A/67 Mar

अनुक्रमणिका

# आनंदी गोपाळ

● ● ● ● ● ●



● ● ● ● ● ●

प्रा. म. वा. धोंड

**श्री. श्री. ज. जोशी यांनी लिहिलेल्या 'आनंदी गोपाळ' या चरित्रात्मक कादंबरीवर प्रा. म. वा. धोंड यांनी केलेल्या परखड परीक्षणाचा हा उत्तरार्ध.......**

काशीताईंच्या चरित्रग्रंथात दिसून येणारी आनंदीबाई कशी आहे ? समग्र वर्णन करायचे तर फारच विस्तार होईल. काही ठळक विशेषच पाहू.

आनंदीबाई ही लहानपणापासूनच नीटनेटकी व हौशी होती (पृ. ३०). लग्न व्हावयाच्या आधी आणि लग्न झाल्यावर सुरुवातीच्या काही वर्षांत तिच्या हूडपणामुळे तिला शिक्षणाबद्दल विशेष आवड नसली, तरी ती आवड एकदा उत्पन्न झाल्यावर तिने जो अभ्यास केला तो नवऱ्याच्या धाकामुळे नव्हे, तर अत्यंत समरसून. कलकत्त्याहून तिने कार्पेंटरमावशीला पाठविलेल्या एका पत्रात ती लिहिते, "जेव्हा जेव्हा मला काही पाठ करावयाचे असेल, तेव्हा तेव्हा मी झोपेत करते. पाठ करण्याचे तेवढे दिवसा फक्त एकदा वाचून ठेवते व त्यावर मग रात्री झोपेत वरीच पारायणे होतात आणि सकाळी उठून पाहावे तो ते अगदी बिनचूक म्हणता येते. काव्यामध्ये एखादा भाग कठीण आहे, असे जर मला दिसून आले, तर तो मी दिवसा तसाच सोडून देते, परंतु रात्री त्याचा मला बरोबर अर्थ कळतो आणि सकाळी मला त्याचे बरोबर भाषांतर करिता येते. मला कोण शिकविते, हे मात्र कळत नाही. परंतु माझा अभ्यास असा होतो."

(पृ. ८९) फ्रॉइडच्या मानसशास्त्राच्या आधी १८८१-८२ साली सोळा वर्षांची मुलगी हे लिहिते आहे. रात्री भूतपिशाच्चादी आपणास मदत करतात अशी तिची समजूत. परंतु तिची मीमांसा सोडून दिली तर तिचा अनुभव अत्यंत उद्बोधक आहे. शिक्षणाबद्दल अत्यंत आवड असल्याशिवाय झोपेत पाठ करणे वा चिंतन करणे शक्य नाही की या पद्धतीने अभ्यास उत्कृष्ट होतो याचा शोध लागण्याचाही संभव नाही. आनंदीबाई शिकते ती शिक्षणाच्या आवडीनेच, गोपाळरावांच्या धाकाने नव्हे, याचा उत्कृष्ट पुरावा तिच्या दुसऱ्या एका पत्रातच आहे. गोपाळराव अमेरिकेस जाण्याचे बेत करतात, त्यावेळी आपल्या येण्याने तिच्या अभ्यासात व्यत्यय येईल की काय, असे ते तिला विचारतात. त्याला उत्तर देताना आनंदीबाई लिहिते, "आपण आल्याने माझ्या अभ्यासात व्यत्यय यावयाचा नाही. जगतात अभ्यासात व्यत्यय आणणारी एकही गोष्ट असेल असे आज मला वाटत नाही." (पृ. २८२) आनंदीबाई झपाटलेली खरी पण गोपाळरावांनी नव्हे तर ज्ञानाच्या लालसेने. आणि धास्तावलेली तर बिलकूल नाही. कलकत्त्याच्या भाषणात, शाळेत जाणाऱ्या मुलीस रस्त्यातील व आजूबाजूचे पुरुष कसे छळतात हे सांगत असता, " पण त्याहीपेक्षा माझ्या बंगाली विद्वान देशबांधवांचा धीटपणा अधिक असून विशेष गंभीरपणाने विचार करण्यासारखा आहे " अशी बंगाली लोकांची त्यांच्या तोंडावर उघड उघड निर्भर्त्सना करणारी १७-१८ वर्षांची मुलगी, भित्री ! त्याच व्याख्यानात, 'अमेरिकेहून परतल्यावर लोक बहिष्कार घालणार नाहीत काय ?' या प्रश्नाला उत्तर देताना ती म्हणते, 'मी या धमकीस तिलप्राय भीत नाही.' गोपाळरावासही ती भीत होती असे तिच्या पत्रांवरून दिसून येत नाही. गोपाळराव तिला कुत्सित लिहीत आणि त्यामुळे ती पराकाष्ठेची दुःखी होई हे खरे. एका पत्रात ती लिहिते, " आपल्या गरम अथवा थंड अशा बोलण्याने वितळणारे किंवा पिंजणारे असे फक्त काळीज मात्र मजजवळ

उरले आहे." परंतु हे दुःख; भीती नव्हे. तिने पत्रात मधूनमधून गोपाळरावांच्या वागण्याची जी मीमांसा केली आहे आणि त्यांना शहाणपणाचे जे चार शब्द सुनवले आहेत त्यावरून गोपाळराव–आनंदीबाई यांचे गुरुशिष्याचे नाते आनंदीबाई अमेरिकेत गेल्यापासून थेट उलट झाले होते, हे स्पष्ट दिसून येते. गोपाळराव आनंदीबाईस काय काय लहीत याचा अंदाज आनंदीबाईच्या पत्रावरूनच काय तो येतो. त्यांनी आपली सर्व पत्रे काशीताईच्या हवाली केली नसण्याचाच संभव आहे. परंतु आनंदीबाईची पत्रे मात्र ते हाती आल्यापासून लोकांना दिमाखाने दाखवीत हिंडत असत. "माझी पत्रे–कित्येक अयोग्य ठिकाणी देऊन त्यांवर त्यांचेकडून टीका व अपमान करून घेतला, हे अगदी गैरशिस्त झाले," असे एका पत्रात आनंदीबाई लिहिते. आनंदीबाईची गोपाळरावांस लिहिलेली पत्रे वाचली की ती अमेरिकेतही गोपाळरावांच्या धाकातच वावरत होती हे असे सुचविणे किती विपर्यस्त आहे हे कळून येते.

आनंदीबाईच्या पत्रांनी केवळ पतिपत्नीसंबंधांवरच प्रकाश पडतो असे नाही, तर त्यातून तिचे व्यक्तिमत्त्वही उजळून निघते. आनंदीबाईने अमेरिकेहून केवळ गोपाळरावांसच नव्हे तर इतर अनेकांना अगणित पत्रे लिहिली. आपल्या दिनचर्येसंबंधी एका पत्रात, " दोन एक तास पत्रे लिहिण्यात " जातात, असे ती लिहिते. यावरून तिने किती पत्रे लिहिली असावीत योची कल्पना येते. त्यांतील फारच थोडी पत्रे काशीताईंच्या चरित्रग्रंथात आलेली आहेत, पण त्यावरूनही आनंदीबाईची बुद्धी किती प्रगल्भ, व्यापक व मूलगामी होती याचा प्रत्यय येतो. सरकारी नोकरीसाठी खटपट करणाऱ्या आपल्या दिराला ती लिहिते—

" आपणा तिघांपैकी (मी, माझे यजमान व तुम्ही) मला जगाचा अधिक अनुभव आहे. (कलकत्त्यास असताना) तीस रुपये दरमहाची एक चांगलीशी नौकरी मेहेरबानीने व माझ्या योग्यतेप्रमाणे मला मिळत होती, परंतु एवढ्या पगाराचे तर काय परंतु याच्यापेक्षा पाचपट अधिक दरमहाच्या नौकरीकरिता देखील आपली स्वतंत्रता विकण्यास माझे मन धजले नाही ज्याच्या योगाने आपल्या देशाची सेवा करिता येईल अशी कला, शास्त्र, व्यापार अगर धंदा आपल्या मनात देखील येत नाही काय ?

. शिक्षण हे आम्हांमध्ये ढोंग व खर्चाचे मात्र काम झाले आहे जर तुमच्या विचारात व पुढील वेतात काही फेरबदल झाला नसला तर तुम्ही मला लिहा म्हणजे तुम्हास तशी एखादी जागा देण्याविषयी मी तुमच्याकरिता मि. जेम्स् यांना लिहीन."

पंडिता रमाबाईंच्या धर्मान्तिराबाबत सर्वच हिंदूंनी त्यांना दोष दिला. परंतु त्या संदर्भात आनंदीबाई जे विचार व्यक्त करते ते खरोखरच मननीय आहेत. ती लिहिते—

" जर रमाबाईंचे धर्मांतरात लोकभ्रांती अथवा आपणास काही मदत व्हावी, अशा प्रकारची आशा, या व्यतिरिक्त अन्य हेतू असला, तर माझी जिव्हा व लेखणी या तिच्या विरुद्ध कधीही वाहणार नाहीत. कारण जे आपल्या समजुतीप्रमाणे व शब्दांस अनुसरून वागतात, त्यांचा मला कळवळा येतो. म्हणून तिने जे हे धीटपणाने काम केले, त्याचा मला अभिमान वाटून तिच्या धैर्याविषयी आश्चर्य वाटले असते. परंतु खरोखर तसे आहे की नाही याचीच शंका आहे . . .काय गंमत आहे पहा ! मी रमाबाईवर टीका करिते असे नाही. परंतु ज्याचे एकेश्वरी मत अगदी पक्के म्हणून म्हणत होता, त्याच मनुष्याने आपले मत बदलून इंग्लडच्या जुन्या चर्चपैकी एका ट्रिनिटेरियन ( त्रैमूर्तिक ) चर्चला जाऊन मिळावे, याची मला फार गंमत वाटते !" ( पृ. २६०–२६२. )

वैद्यकीय शिक्षण घेण्याचा आपला हेतू तिने जो एके ठिकाणी स्पष्ट केला आहे, त्यावरून ती किती दूरवरचा विचार करीत असे ते दिसून येते. ती म्हणते —

" हिंदुस्थानातल्या लोकांकरिता काही आपण करावे, असे जर मला न वाटते, तर इतक्या लांब मी आले नसते व इतका कडक अभ्यासही केला नसता––हिंदुस्थानात परत जाऊन आपल्या स्त्रीवर्गाकरिता एक कॉलेज स्थापावे हा माझा मुख्य उद्देश

एकटीच्या हातून लोकांस प्रत्यक्ष उपयोग तो किती होणार ! कारण मी जर मरून गेले –– आणखी तीही हिंदुस्थानात डॉक्टर होऊन परत गेल्यावर एकदोन वर्षांतच–– तर माझ्या वैद्यक ज्ञानाचा उपयोग कसा होणार ! एवढ्याकरिता चिरस्थायी व शाश्वत अशा प्रकारचे काही तरी करावे, असे माझ्या मनात फार आहे." (पृ. ४०८)

असे उतारे किती म्हणून द्यावे ? तिची सर्वच पत्रे वाचनीय आहेत. ही पत्रे तिने इंग्रजीत लिहिली. काशीताईच्या चरित्रग्रंथात त्यांची भाषांतरे आहेत. ती एका पत्रात लिहिते – "शब्दांची योग्य रचना झाली नाही तर ती मला आवडणार नाही." (पृ. २६२) यावरून ही पत्रे तिने किती साक्षेपाने लिहिली असावीत ते कळून येते. ती जर मुळातूनच वाचायला मिळाली असती तर तिच्या शैलीचा व व्यक्तित्वाचा आगळाच प्रत्यय आला असता.

आनंदीबाईने पत्रे साक्षेपाने लिहिली असे म्हटले खरे, पण साक्षेप हा तिचा सहजस्वभावच असावा असे वाटते. तिने अमेरिकेत जाण्यापूर्वी जे भाषण केले ते व्याख्यान नव्हते; तिला तिच्या परदेशगमनासंबंधी जे अनेक प्रश्न विचारले जात त्यांपैकी सहा प्रश्नांची उत्तरे होती ती. पण ते प्रश्न असे विचारपूर्वक निवडलेले आणि त्यांची उत्तरे अशा व्यापक व प्रगल्भ भूमिकेतून दिलेली की त्यातून एक संपूर्ण व स्वयंपूर्ण व्याख्यान साकार व्हावे. आनंदीबाईने वेळोवेळी लिहिलेली पत्रे आणि केलेली भाषणे वाचली की तुकारामाच्या ' सहज बोलणे हित उपदेश ' आणि ज्ञानदेवांच्या ' श्वासही प्रबंध होआवे ', या दोन्ही उक्तींचा एकाच वेळी प्रत्यय येतो.

आनंदीबाई अमेरिकेस पोचल्यावर तीन-एक महिन्यांतच कार्पेटरबाईच्या एका आल्बममध्ये तिने ३७ प्रश्नांची उत्तरे लिहून









अनुक्रमणिका

ठेवली होती. ती सर्वच वाचनीय आहेत पण विस्तारभयास्तव त्यांतील फक्त काही देतो. " (१९) निर्वाणीला देखील ज्या पुस्तकाचा वियोग सहन होणार नाही असे पुस्तक कोणते ?— जगाचा इतिहास. (२०) जन्मधारणाला कोणता काल इष्ट आहे ?— वर्तमानकाल (२६) आपल्या-खेरीज दुसऱ्या कोणत्या मनुष्यासारखे व्हावेसे वाटते ?— कोणासारखेही नाही. (३१) तुझ्यात विशेष गुण कोणता —तो अजून आढळला नाही. (३३) अत्यंत उदात्त असा मनोविकार कोणता ? –प्रेम" ही उत्तरें पत्रांतून व भाषणांतून प्रतीत होणाऱ्या तिच्या व्यक्तिमत्त्वास साजेशीच आहेत. इ. स. १८८८ मध्ये फिलाडेल्फि-यात प्रसिद्ध झालेल्या पंडिता रमाबाईच्या एका ग्रंथाच्या प्रस्तावनेत, डीन बॉड-लेनी आनंदीबाईचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे— "In the performance of college duties, going in and out, and up and down, always in her measured, quiet, dignified, patient way, she has filled every room, as well as the stairways and halls, with memories which now hallow the home, and must continue so to do throughout the years to come." †

पत्रांत, भाषणांत, प्रश्नोत्तरांत दिस-णाऱ्या आनंदीबाईशी किती सुसंगत आणि श्री. जोशी यांच्या कादंबरीतील झपाट-लेल्या व धास्तावलेल्या आनंदीशी किती विसंगत वर्णन आहे हे !

आनंदीबाईच्या पत्रांत दिसून येणारा एक विलोभनीय विशेष म्हणजे तिची विनोदबुद्धी. या विनोदाचा रोख बहुतेक वेळा गोपाळरावांच्या वर्तनावर असे. गोपाळरावांना लिहिलेल्या एका पत्रात ती म्हणते, "आपल्या पत्रांचा ताळमेळ मुळीच लागत नाही. एकदा लिहिले की, लांब पत्र न आल्यास चालेल, परंतु आठ-वड्यास कार्ड तरी पाठवावे. फिरून लिहिले आहे, वारंवार पत्र न आले तरी चालेल, परंतु महिन्याने एकच लांब पत्र आले तरी चालेल. याप्रमाणे नित्य नवा मजकूर. मला वाटते की, वरील दोन मार्गांपैकी एक खरा व दुसरा थट्टेचा असावा. परंतु खरा कोणता व थट्टेचा कोणता याचा न्याय येत्या पत्री लिहून कळवावा." ( पृ. २९२). गोपाळराव अमेरिकेस यावयास निघाले त्यावेळी ती लिहिते, " आपण येथे आल्यावर परस्परांची भेट कशा प्रकारे व्हावी या संबंधाने मी जे लिहिले, त्याचा हेतू एवढाच की आयत्या वेळी घोटाळा होऊन राहू नये व त्याचा दोष मजवर येऊ नये. परक्या-प्रमाणे आपल्याही हातात हात घालून हल-वावा, अशीच जर आपली इच्छा असेल तर त्याप्रमाणे करण्यास मी राजी आहे. अथवा ती गोष्ट मी जरी जन्मात कधी केली नाही, तरी हिंदु स्त्रीप्रमाणे भीरुतेने मागे घ्यावे, असा प्रकार आपणास इष्ट वाट-ल्यास तसेच मी करीन. आपल्या लोकात वायको नवऱ्याला चकचकीत नमस्कार करीत नाही, त्यामुळे मलाही तसे करिता येणार नाही हे उघड आहे. किंवा, " आपण कसे आहा ? आपणास पाहून मला फार आनंद वाटतो ?" एवढेच म्हणून मी स्वस्थ बसावे अशी आपली इच्छा असल्यास तसे करीन. या अनेक प्रकारांपैकी लज्जावती हिंदु स्त्रीप्रमाणे मी व्हावे हेच आपणास पसंत पडत असेल तर आपण आल्यावरोबर झट्‌कन मी आपल्या खोलीत पळून जाईन." ( पृ. ३३० ) गोपाळराव अमेरिकेस गेल्या-वर आनंदीबाईबरोबर परतायचा त्यांचा विचार नव्हता. त्यासंबंधी आनंदीबाई आपल्या सासूला लिहिते, " बहुत करून मला स्वदेशी एकटेच यावे लागेल. मज-बरोबर येण्याचा आग्रह करीत आहे, परंतु तसे न करण्यास अनेक कारणे सांगतात. व काही महिन्यांनी मागाहून येईन म्हण-तात. रशियामध्ये जाण्याचा छंद घेतला आहे व इंग्लंडात जाऊन इंग्लिश लोकांना शिव्या देणार, आहेत." ( पृ. ३५८ ). आणि श्री. जोशी म्हणतात, "लग्नापासून ती त्यांना वघत होती. कित्येक प्रसंगांतून दोघे गेली होती. पण गोपाळराव तिला कळलेच नव्हते." ( आ. गो. पृ. ३४७ ).

आनंदीबाईला गोपाळरावांच्या स्वभा-वाचे कोडे उलगडले. पण केव्हा ? मृत्यू-पूर्वीच्या दोनचार दिवसांतच ! आणि कोणत्या प्रसंगामुळे ? तर गाढवागाढवीच्या विवाहामुळे ! श्री. जोशी यांना हा प्रसंग विलक्षण अर्थपूर्ण वाटला. गोपाळरावांचे कोडे सोडवणारी गुरुकिल्ली त्यांना या

† Ramabai: High cast Hindu Woman, Philadelphia, 1888, Introduction P.iii. हे पुस्तक मला श्री. श्या. म. आढाव यांच्याकडून मिळाले.

विवाहात सापडली. आपल्याप्रमाणेच आनंदीबाईलाही गोपाळरावांचे कोडे सुटावे आणि तिनें स्वस्थचित्ताने डोळे मिटावेत या सद्हेतूने त्यांनी तिच्या मरणोत्तर झालेला हा सोहळा तिच्या हयातीतच साजरा करून टाकला. आनंदीबाईला कोडे सुटले! आणि तिचे उत्तर कोणते? "तुम्ही काळाच्या चौकटीत कधी बसलांच नाहीत फार पुढे गेलांत फार पुढे गेलांत इतक्या पुढे जाणाऱ्या माणसाला लोक क्षमा करीत नाहीत तुमचं मन जन्मभर दुखवलं गेलं. त्याच्यावर उतारा म्हणून तुमचं हे असं वागणं होतं." ( आ. गो. पृ. ३४८).

गोपाळराव काळाच्या फार फार पुढे गेले होते का ? इथे श्री. जोशी यांनी 'काळा'-चा अर्थ फार संकुचित केला आहे. त्यांना अभिप्रेत आहे तो काळ केवळ भारत देशातीलच; इंग्लंड, युरोप, अमेरिका या देशांतील नव्हे. भारतात देखील गोपाळराव हे स्त्री शिक्षणाचे आद्य पुरस्कर्ते होते का ? ज्योतिबा फुल्यांनी १८४८ त मुलींची शाळा काढली होती. १८८२ त भारतात २७०७ मुलींच्या शाळा होत्या आणि त्यात १२७०६६ मुली शिक्षण घेत होत्या. हे शिक्षण अर्थात प्राथमिक होते. १८८३ त मुंबई विद्यापीठाने स्त्रियांना प्रवेश देण्यावरील बंदी उठविली.† विधवा असूनही इंग्लंड अमेरिकेस जाणारी पंडिता रमाबाई, कोर्टाचा हुकूम धाब्यावर बसवून नवऱ्यापासून वेगळी राहाणारी व इंग्लंडला जाऊन डॉक्टर झालेली रखमाबाई या महाराष्ट्री स्त्रियाही आनंदीबाईच्या समकालीनच. आनंदीबाईला उच्च वैद्यकीय शिक्षणासाठी अमेरिकेस पाठविण्यात गोपाळरावांनी मोठेच धैर्य दाखविले यात शंका नाही. पण म्हणून ते काळाच्या नव्हे तर समाजाच्याही फार फार पुढे गेले होते असे म्हणता येत नाही. आनंदीबाई अमेरिकेहून परतल्यावर नेवाश्याच्या लोकांनी तिला मानपत्र दिले होते, ( चरित्र पृ. ३८०–८२ ) हे लक्षात घेतले तर ते समाजाच्या चार पावले पुढे होते एवढेच म्हणता येईल, फार फार पुढे नव्हे. शंभर वर्षांपूर्वी 'सुखदायक राज्यप्रकरणी निबंध' प्रकाशित करून आणि त्याचे इंग्रजी भाषांतर इंग्लंड, अमेरिका, चीन इत्यादी देशांत पाठवून समाजसत्तावादाचा आणि स्वैर विवाहाचा पुरस्कार करणारे विष्णुबोवा ब्रम्हचारी काळाच्या पुढे गेले होते. गोपाळरावांनी बाप्तिस्मा घेऊन परत हिंदू धर्मात प्रवेश केला आणि बाप्तिस्माचा फोलपणा दाखविला म्हणून ते काळाच्या फार फार पुढे गेले होते म्हणावे, तर ६०० वर्षांपूर्वी बहिरा पिसा याने याहून विलक्षण प्रकार केला होता. हिंदूधर्म सोडून हा मुसलमान झाला. पण मुसलमान होऊनही कानाची भोके तशीच राहिली मग आपण अविध कसे, असा काजीला सवाल करून तो परत हिंदू झाला. आपण हिंदू झालो तरी मुसलमान होताना केलेल्या सुंतेची चामडी काही परत आली नाही, त्याअर्थी आपण हिंदूही नाही, असा मुद्दा उपस्थित करून त्याने हिंदू पंडितानाही निरुत्तर केले. आणि धर्मातीत होऊन विश्वधर्माचा पुरस्कार करण्यात त्याने शेष आयुष्य वेचले. त्याच्या नंतर ६०० वर्षांनी 'ब्राम्हण नाही, हिंदुहि नाही, न मी एक पंथाचा' असे उद्गार केशवसुतांनी काढले आणि ते नव्या युगाचे प्रेषित ठरले. याला म्हणतात काळाच्या फार फार पुढे जाणे. गोपाळरावांचा लोकांनी छळ केला त्याच्यावर उतारा म्हणून ते विक्षिप्तपणे वागले, ही मीमांसा तरी बरोबर आहे काय ? काय छळ केला होता गोपाळरावांचा लोकांनी ? उलट गोपाळरावांनीच लोकांचा सतत छळ चालवला होता. आयुष्यभर कुत्सित बोलून



† S.N.D.T. Women's University Golden Jubilee Commemoration Volume, Bombay 1968, P. 80.









वा लिहून त्यांनी आनंदीबाईसारख्या साध्वी पत्नीला छळलेच, पण अमेरिकेतल्या व्याख्यानांत अमेरिकन समाजाची निंदा करून त्यांना, गाढवगाढवीचे लग्न लावून सनातन्यांना, खोटा बाप्तिस्मा घेऊन ख्रिश्चन मिशनऱ्यांना आणि चहाग्रामण्य प्रकरण उपस्थित करून न्यायमूर्ती रानडे, लोकमान्य टिळक, गोपाळकृष्ण गोखले, प्रभृती ४६ गृहस्थांना व त्यांच्या कुटुंबियाना विलक्षण मनस्ताप दिला. गोपाळरावांच्या या लीला समाजसुधारणेला पोषकच ठरल्या असे मानले, तरी त्यात त्यांचा हेतू निव्वळ समाजसुधारणेचाच होता असे मानणे चुकीचे होईल. गोपाळराव हे काही फुले, रानडे, आगरकर, कर्वे यांच्या जातीचे कर्ते समाजसुधारक नव्हते. मग ते कसे होते ?

गोपाळराव हे विलक्षण एककल्ली व प्रसिद्धीस अतोनात हपापलेले गृहस्थ होते. एखादी लोकविलक्षण कल्पना डोक्यात शिरली की तिचा पिच्छा पुरवायचा, तिच्यासाठी जीवाचा आटापिटा करायचा आणि स्वतःसाठी यथेच्छ प्रसिद्धी मिळवायाची, हेच त्यांनी आयुष्यभर केले. त्यातूनच गाढवगाढवी विवाह, बाप्तिस्मा, चहाग्रामण्य ही प्रकरणे उभी राहिली. आनंदीबाई जोशी हे त्यांच्या दृष्टीने यांतीलच एक प्रकरण होते. त्यांनी आनंदीबाईशी लग्न केले ते पत्नी हवी होती म्हणून नव्हे, तर 'कोणी तरी एक स्त्री शहाणी करून लोकांना उदाहरण दाखवायचे' म्हणून (चरित्र १९). आनंदीबाई ही त्यांच्या लेखी या प्रयोगाचे केवळ उपकरण होते. प्रयोग यशस्वी झाला. गोपाळरावांना हवी असलेली प्रसिद्धीही मिळाली. थोरामोठ्यांशी त्यांच्या ओळखी झाल्या. परंतु या यशात एक मोठेच वैगुण्य राहिले.आनंदीबाईस त्यांनी या प्रयोगाचे उपकरण मानले होते. पण त्या उपकरणानेच आपल्या प्रभावी व्यक्तिमत्वाने एवढी कीर्ती मिळविली की त्यात खुद्द प्रयोगकर्ताही निष्प्रभ होऊन गेला. गोपाळरावाना हवी असलेली प्रसिद्धी मिळाली पण ती गोपाळराव जोशी म्हणून नव्हे, तर डॉ. आनंदीबाई जोशींचे यजमान म्हणून. न्या. तेलंग यांच्या एका पत्रात गोपाळरावांचा उल्लेख आहे तो Mr. Joshi ( the husband of Anandibai ) अशा कंसातील स्पष्टीकरणासह* "उत्तमा आत्मना ख्याताः पितुः ख्याताश्च मध्यमाः। अधमा मातुलाख्याताः श्वशुराश्चाधमाधमाः।" या सुभाषितात स्वतःच्याच कर्तृत्वाने ओळखला जाणारा उत्तम असे म्हटले आहे ते योग्यच आहे. पण पित्यामुळे ओळखला जाणारा मध्यम, मामामुळे ओळखला जाणारा अधम व सासऱ्यामुळे ओळखला जाणारा अधमाधम अशी प्रतवारी कशाच्या आधारे लावली आहे ? या यादीत आई, मावशी, सासू असे पिता, मामा व सासरा यांना जबाबी स्त्रीनातलग तर नाहीतच पण पित्यापेक्षा मामा कमी का, तर तो आईचा भाऊ म्हणून व मामापेक्षांही सासरा कमी का, तर तो बायकोचा बाप म्हणून. मग खुद्द बायकोमुळेच जो ओळखला जातो तो अधमाधमाहून किती नीचतर कोटीत गणला गेला असता हे स्पष्ट आहे. ती पाळी गोपाळरावांवर आली आणि त्यांचा पुरुषी अहंकार विलक्षण दुखवला गेला.

आनंदीबाईमुळे आपल्यावर ही पाळी आली म्हणून गोपाळरावांनी तिचा छळ मांडला. तिला कुत्सित पत्रे लिहिली. तिच्यावर चवचालपणाचा व बेइमानीपणाचा आरोप केला. पण तिच्यावर असा नवरेपणा गाजवूनच केवळ समाजात होत असलेल्या अपमानाची भरपाई कशी होणार ? त्याकरिता आनंदीबाईवर नव्हे, तर तिची जनमानसात जी प्रतिमा निर्माण झाली होती, तिच्यावरच प्रहार करणे आवश्यक होते. आनंदीबाईला मोठेपणा कशामुळे मिळत होता ? ती परदेशात गेली, अमेरिकन समाजात तीन वर्षे राहिली, स्त्री असूनही उच्च शिक्षण घेतले आणि पाश्चात्य वैद्यकशास्त्र शिकली म्हणूनच ना ? गोपाळरावांनी आनंदीबाईच्या या विशेषांवरच प्रहार करण्यास सुरुवात केली. त्यानी स्वतःचं परदेशचा दौरा काढला आणि केवळ अमेरिकेसच नव्हे तर ब्रम्हदेश, चीन व जपान या देशांस जाऊन व इंग्लंड, युरोप, रशिया या देशांसही जाण्याचा बेत आखून तिच्याहून आपले श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. आनंदीबाई अमेरिकन समाजात तीन वर्षे राहिली म्हणून ती मोठी मानली जात असेल, तर तो अमेरिकन समाजच अत्यंत नीतिभ्रष्ट, असे आवेशपूर्ण प्रतिपादन त्यांनी अमेरिकेतील व्याख्यानात केले. आणि आनंदीबाईने अमेरिकन लोकांशी जोडलेल्या संबंधावर घाव घातले. स्त्री असूनही उच्च शिक्षण घेतले म्हणून आनंदीबाई मोठी मानली जात असेल तर स्त्रीशिक्षणच अनिष्ट आहे,असाही प्रचार त्यांनी अमेरिकेतील व्याख्यानात केला. राहता राहिले पाश्चात्य वैद्यकशास्त्र. त्याच्यावरही प्रहार करण्याची संधी त्यांना लौकरच प्राप्त झाली. आनंदीबाईचे दुखणे पाश्चात्य वैद्यकाच्या उपायाने बरे होईना, याचा गोपाळरावांना मनातून आनंदच वाटला असावा. ते दुखणे जर देशी वैद्यकाने बरे करता आले तर आनंदीबाईच्या यशाच्या मुळावरच घाव होणार होता. म्हणूनच ते त्या दृष्टीने जोरदार प्रयत्न करू लागले. आनंदीबाईच्या आजारासंबंधी मामा परमानंदांना धाडलेल्या एका पत्रात ते लिहितात :

"It is a neglected case and pronounced hopeless by European Doctors. If she recovers, which I hope she will, it will be a victory for native drugs; but will that day come when both educated and uneducated men are after foreign things ?" †

* पु. वा. कुळकर्णी, मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड, मुंबई १९६३. (पृ. ५००)

† कुळकर्णी, मामा परमानंद. पृ० ५०८.

आनंदीबाई आजारातून उठली असती तर गोपाळरावांना आनंद झाला असता तो देशी वैद्यकशास्त्राच्या विजयाचा ! म्हणजेच आनंदीबाईने प्राविण्य मिळविलेल्या पाश्चात्य वैद्यकशास्त्राच्या पराजयाचा !

आनंदीबाईच्या बाबतीत गोपाळरावांनी जे विक्षिप्त व निर्घृण वर्तन केले, त्यातील संगती मी नव्यानेच दाखवितो आहे असे नाही. श्री. जोशी यांनाही ती दिसली होती. आनंदीबाईच्या कलकत्त्याच्या भाषणाच्या वेळी गोपाळरावांची मनस्थिती वर्णन करताना ते म्हणतात, "क्षणभर त्यांच्या मनात विचार आला की, आपणही आग भडकवली नसती तर बरं झालं असतं. आपणच ठिणगी टाकली आग आता आकाशाला भिडली त्या आगीत आपलं अस्तित्व कुठे टिकणार? 'झाड' च ब्रम्हसमंधाच्या उरावर बसणार मनातल्या मनात व्यथित होऊन ते ऐकत राहिले." ( आ. गो. पृ. १९३ ) पण पुढे ते ती विसरले आणि गोपाळरावांच्या मोठेपणाच्या कल्पनेनेच भारून गेले. क्षुद्रबुद्धीचे गोपाळराव फार फार मोठे झाले ! खुद्द आनंदीबाईनेही ही मीमांसा एका पत्रात सुचविली आहे. अमेरिकेतील व्याख्यानांत गोपाळराव स्त्रीशिक्षणाचे वाभाडे काढू लागले, त्यासंबंधी आनंदीबाई लिहिते, " काही तर म्हणतात की, आपल्या बायकोला शिक्षण देण्याकरिता इकडे पाठविले, त्याचा आपणास पश्चात्ताप होऊनच आपण असे बोलला !" (चरित्र पृ. ३२४.)

सारांश, आनंदीबाई व गोपाळराव यांच्या जीवनातील व कालातील घटना, तत्कालीन परिस्थिती व सामाजिक वातावरण आणि आनंदीबाई व गोपाळराव यांचे स्वभावचित्रण, या तिन्ही बाबतीत सत्याशी व वास्तवाशी संगती राखण्याचे लेखकाला जमलेले नसल्यामुळे, चरित्रपर कादंबरी म्हणून ही कादंबरी अयशस्वी ठरली आहे. आता कादंबरी म्हणून तरी ही श्रेष्ठ ठरते का, या प्रश्नाचा विचार करू.

'आनंदी गोपाळ' या कादंबरीचा वाचकांवर कोणता परिणाम होतो ? ब्रम्हसमंधाने झपाटलेली व त्याची धास्ती घेतलेली एक सोशीक व कष्टाळू, बुद्धिमान व मेहनती मुलगी जीवापाड अभ्यास करून परीक्षेत मोठे यश मिळविते, पण त्या यशाचे फळ पदरात पडण्यापूर्वीच मृत्युमुखी पडते तिच्या दुर्दैवाची ही कहाणी आहे. श्री. जोशी कादंबरीच्या प्रस्तावनेत म्हणतात, "आनंदीबाईचे चरित्र कारुण्याने ओथंबलेले आहे." त्यांनी कादंबरीही याच धर्तीवर लिहिलेली आहे. हळव्या वाचकाचे डोळे वारंवार डबडबून यावेत अशी.१

परंतु आनंदीबाईचे चरित्र कारुण्याने ओथंबलेले आहे का ? अगदी लहानपणापासून दुर्दैवाने आनंदीबाईची पारध चालविली होती ही गोष्ट खरी आहे. बालवयातच तिला देवी येऊन तिच्या तोंडावर कायमचे वण राहिले. आईसंबंधी आनंदीबाई लिहिते, " माझ्या आईने देखील घोड्याच्या चाबुकाशिवाय दुसऱ्या कशाचा उपयोग मजवर केलं नाही. चांगले गोड बोलणे तर लांबच परंतु दगड, काठ्या व विस्तव यांशी गाठ ! नशिबाने याचा माझ्या अंगावर कोठे माग राहिला नाही. तसेच या सपाट्यात मी लंगडी लुळी झाले नाही !" लग्न झाल्यावरच्या सुरुवातीच्या दोन-चार वर्षात नवऱ्यानेही मारपीट व दुसरे अत्याचार केले. त्यासंबंधी आनंदीबाई लिहिते, " दहावे वर्षी म्हणजे अगदी लहानपणी अंगावर मोडलेली लाकडे. बाराव्या वर्षी फेकून मारलेल्या खुर्च्या, बुके व मी तुला टाकून देईन अशा प्रकारच्या धमक्या व तसेच १४ व्या वर्षी अमलात आणलेले नाना प्रकार, हे सर्व त्या त्या वयाच्या, शरीराच्या व मनाच्या मानाने अतीच कडक होते— आपण मला जिवंत ठेवू नये, तर मारून टाकावे, अशी मी आपणांस विनंती केली होती." (चरित्र पृ. २४४–२४५ ). ती माता झाली, पण ते मातृपद १० दिवसांवर काही टिकले नाही. ती शाळेत जावयास लागली तेव्हा समाजाने तिला छळले. त्याचे निवेच पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे—" मी शाळेत जाताना, रस्त्यात आजूबाजूच्या लोकांनी जमावे, काही मंडळींनी माझी कुचेष्टा करावयास आरंभ करून हशा पिकवावा, काहींनी सभ्यमुद्रा धारण करून खिडक्यात बसावे आणि तिथून चावटपणाची भाषणे करावी; इतकेच नव्हे

तर कित्येक वेळा खडे मारण्यास देखील कित्येक मंडळी चुकली नाही ! रस्त्यातील तांबोळी व वाणीबकाल यांनी मजकडे पाहून थुंकावे आणि असे काही हातवारे आणि मुद्रा कराव्या की त्या सांगणे देखील निर्लज्जपणाचे काम आहे." ( चरित्र पृ. १२७–२८ ). ती अमेरिकेत असताना तिला गोपाळरावांनी वारंवार कुत्सित पत्रे लिहून मनस्ताप दिला, आजाराने वरचेवर लोळविली आणि गोपाळरावांच्या अमेरिकेतील वेडगळ भाषणांनी लाज आणली. परंतु आनंदीबाई कधीच खचली नाही. दुर्दैवावर ती सतत मात करीत गेली. देवीच्या वणांनी चेहरा विद्रूप झाला, पण नीटनेटक्या पोषाखाने तिने ते व्यंग भरून काढले. आईने मारझोड केली, " पण लहानपण निघून गेल्यावर प्रीतीत काही अंतर पडले नाही." ( चरित्र पृ. २४६ ). नवऱ्याने छळले, अत्याचार केले, पण त्याने लावलेल्या विद्येच्या गोडीतच तिने आपले मन रमविले. शाळेत जात असता समाजाने जो छळ केला, त्याने अमेरिकेत एकटे जाण्याएवढा धीटपणा तिने अंगी वाणवला. अमेरिकेतील वास्तव्यात गोपाळरावांनी व आजाराने तिला जो मानसिक व शारीरिक ताप दिला त्याची भरपाई अभ्यास, वाचन, प्रवास, पत्रव्यवहार, मैत्री इत्यादी अनेक मार्गानी आपला बौद्धिक व नैतिक विकास साधून, आपले व्यक्तिव संपन्न करून आणि देशसेवेचे मनसुवे रचून केली. पण अखेर दुर्धर व्याधीने तिचे शरीर पुरे पोखरून तिला मृत्युशय्येवर खिळवून ठेवले आणि दैवाशी सतत चालत असलेला हा विषम लढा एकदाचा संपला. ही कारुण्याने ओथंबलेली कहाणी नाही. ही माणसाच्या दुर्दम्य विजिगीषेची व अंतिम अगतिकतेची शोकात्मिका आहे.



कल्याण, अलिबाग, कोल्हापूर, मुंबई, भूज, कलकत्ता, श्रीरामपूर, फिलाडेल्फिया आणि परत मुंबई व पुणे ही आनंदीवाईच्या जीवनयात्रेची क्षेत्रे. कल्याणहून तिची जी ही भ्रमंती झाली ती त्या त्या ठिकाणी तिला जावे लागले म्हणून नव्हे, तर सुरुवातीला गोपाळरावांच्या इच्छेने आणि पुढे स्वतःच्याच इच्छेने. माहेरच्या मंडळींत राहून आनंदीचे शिक्षण होणार नाही, म्हणून गोपाळरावांनी अलिबागेस वदली मागून घेतली. अलिबागेच्या व्रात्य कोकणी लोकानी त्यांना भंडावून सोडले, तेव्हा ते देशावर कोल्हापुरात आले. तिथेही नीट शिक्षण होईना, म्हणून त्यांनी मुंबईला वदली मागून घेतली. पण मुंबई कल्याणच्या जवळच असल्यामुळे आनंदीच्या माहेरच्या मंडळींची ये–जा सुरू झाली आणि तिच्या अभ्यासात व्यत्यय यायला लागला, म्हणून महाराष्ट्राबाहेर, गुजरातेत, भुजेला ते गेले. भुजेहून ते कलकत्याला गेले, ते कलकत्ता ही भारताची राजधानी म्हणून आणि तिथे आनंदीला पोस्टात नोकरी मिळण्याचा संभव होता म्हणून. श्रीरामपूर हे मिशनऱ्यांचे केंद्र होते, म्हणून ते तिथे गेले. आणि तिथून आनंदीबाई अमेरिकेला गेली. आनंदीबाईचा हा सगळा प्रवास पाहिला की स्वत्वाच्या शोधात आनंदीबाई माहेर, कोकण, महाराष्ट्र, मुंबई व हिंदुस्थान यांपासून हळूहळू कशी दूरदूर जात चालली होती ते कळून येते. नातलग, समाज, पती व देश यांपासून आनंदीबाई जरी दूरदूर जात राहिली तरी संस्कार, चालीरीती, धर्म, समाजऋण, देशप्रेम व पतिनिष्ठा या पाशांनी ती या सर्वांना बांधली गेली होती. हे पाश एवढे चिवट असतात की तुटता तुटत नाहीत. स्वत्वाचा शोध घेण्याची दुर्दम्य इच्छा व त्याला प्रतिबंध करणारे हे पाश यांच्या ओढाताणीत जिवाचे विलक्षण हाल होतात आणि त्याची झगडण्याची शक्ती क्षीण होत जाते. पंडित रमाबाई व डॉ. रखमाबाई या दोन्ही स्त्रिया आनंदीबाईच्या समकालीनच, पण आपल्या उद्दिष्टाच्या आड आपला धर्म येत आहे असे दिसताच शास्त्र्याची मुलगी असूनही पंडिता रमाबाईने धर्म सोडला आणि रखमाबाईने समाज व कायदा या दोघांनाही धाब्यावर बसवून नवरा सोडला. पण 'आपण जशा जात आहोत तशाच परत येणार', ही आनंदीबाईची प्रतिज्ञा होती. आनंदीबाई अमेरिकेत राहिल्यावर ख्रिस्ती होईल, आपल्याला सोडील, अमेरिकेतच वास्तव्य करून राहील, अशी गोपाळरावांना सारखी भीती होती आणि त्याच भीतीपायी तिने आपल्या पोषाखात व आहारातही काही बदल करू नये, अशी तिला ताकीद होती. आनंदीबाईही, "मी आपणांस खात्रीपूर्वक सांगते की, जेव्हा आपला व आपल्या वायकोचा वियोग झाला, तेव्हा जशी ती होती, तशीच व त्याच स्थितीतही अद्यापही ती आहे" ( चरित्र पृ. २४७ ) असे त्यांना वारंवार आश्वासन देते. परंतु आनंदीबाईच्या मनात अगदीच चलबिचल होत नव्हती, असे मानणे मनुष्यस्वभावास धरून होणार नाही. प्रेमळ अमेरिकन कुटुंबात तीन वर्षे वास्तव्य केल्यावर आणि अनेक अमेरिकन लोकांशी स्नेहाचे संबंध जोडल्यावर अमेरिकन कौटुंबिक व सामाजिक जीवनाशी आपल्या कौटुंबिक व सामाजिक जीवनाची तुलना मनात न येणे स्वाभाविक नव्हते. गोपाळरावांवरील तिची निष्ठा तिच्या पत्रांत वेळोवेळी व्यक्त झाली असली तरी त्यांना सोडून जाण्याची कल्पना तिच्या मनात कधीही आली नव्हती असे नाही. एका पत्रात ती लिहिते, " आपण म्हणत होता त्याप्रमाणे त्या पोरकट वयात आपणास

सोडून गेले असते, तर काय झाले असते ? मी गमावले असते. ( व अशा किती मुली सासूच्या व नवऱ्याच्या जाचाने घरदार सोडून गेल्या आहेत ) मी जर असे काही अविचाराने केले असते, तर माझ्या बापाच्या अब्रूला धक्का लागेल, ही भीती मला वाटत होती, म्हणून मी तसे काही केले नाही." ( चरित्र पृ. २४५ ). पत्रातील प्रसंग जरी पोरकट वयातील असला तरी पत्र लिहिले आहे अमेरिकेत असताना. पुढे तिला गोपाळरावांशी जखडून ठेवले ते कृतज्ञताभावाने. ही कृतज्ञताही तिने पत्रात वेळोवेळी व्यक्त केली आहे. ख्रिस्ताबद्दल ती लिहिते, " अठरा शतके होऊन गेली तरी ख्रिस्तास मान का देतो ? व त्यावर प्रीती का करतो ? याचे कारण फक्त हेच की, त्याच्या मनाची पक्की स्थिती व पूर्ण विकास, त्याची मते, तत्त्वे व शिक्षा या गोष्टी अजून कोणीदेखील नाकबूल करीत नाही. ख्रिस्त हा शेवटचा व श्रेष्ठ असा साधू व भविष्य सांगणारा होऊन गेला." ( चरित्र पृ. २६१ ) "आनंदीबाईचा पुढे निरीश्वर मताकडे कल गेला होता," असे काशीताई सांगतात ( चरित्र पृ. ३७३ ) तेही या संदर्भात लक्षात घेण्याजोगे आहे. परंतु मनाचा व बुद्धीचा असा विकास होत असताही आपल्या जुन्या निष्ठा जोपासण्याचा तिने आटोकाट प्रयत्न केला. कलकत्त्यास असतानाच तिची प्रकृती बिघडली होती. अमेरिकेच्या हवेत व ती करीत असलेल्या परिश्रमात तिला सकस अन्नाची अत्यंत आवश्यकता होती. तिला मिळत असलेल्या शाकाहारात आवश्यक ती सकसता नसताही तिने तो सोडला नाही. तिथल्या कडक हिवाळ्याला भारतीय पोषाख पुरा पडत नसताही तिने तो बदलला नाही. अशा रीतीने ती आपल्या शरीराचे आरोग्य घालवून बसली. गोपाळरावांची कुत्सित पत्रे व विक्षिप्त वागणूक आणि त्यांच्यावरची तिची निष्ठा या झगड्यात ती मनाचेही स्वास्थ्य घालवून बसली. शरीराच्या व मनाच्या अशा विकल अवस्थेत एकच आशा शिल्लक राहिली आणि ती म्हणजे ज्या हवेत आपण वाढलो, ज्या अन्नावर आपला पिंड पोसला गेला, ज्या लोकात आपण लहानाचे मोठे झालो, त्या हवेने, त्या अन्नाने, त्या लोकांच्या सहवासाने आपली प्रकृती पहिल्यासारखी होईल ही. आनंदीबाईला आपल्या भूमीची, आपल्या अन्नाची व आपल्या नातलगांची विलक्षण ओढ लागली आणि स्वत्वाच्या शोधात नातलग, समाज, पती व देश यांना सोडून दूरदेशी गेलेली आनंदीबाई परत त्यांच्यातच येऊन पडली.

आपल्या लोकात आनंदीबाई परत येऊन पडली ती शरीराच्या व मनाच्या अत्यंत विकल अवस्थेत. दैवाशी झगडण्याची शक्ती अंगात उरली नव्हती. 'हिंदुस्थानात परत आल्यावर आपल्यावर बहिष्कार घातला गेला तर काय या प्रश्नास 'त्यांच्या धमकीस मी तिलप्राय भीत नाही,' असे उत्तर देणारी आनंदीबाई परजातीचा स्पर्श टाळू लागली, त्यांच्या हातचे पाणी पिईना. पाश्चात्य वैद्यकशास्त्राचे शिक्षण घेण्याकरिता अमेरिकेस जाऊन एम्. डी. झालेली आनंदीबाई मेहेंदळे वैद्यांनी औषधोपचार करावे म्हणून करुणा भाकू लागली, कोणी देईल ती औषधे घेऊ लागली, गोपाळरावांनी काढ्याचे प्रमाण चौपट करून काढा दिला तरी तो घेतला, एवढेच नव्हे तर अंगारे धुपारेही करू लागली. (चरित्र पृष्ठे ३८७–४०३ ). स्वत्वाच्या शोधात अलिबाग, कोल्हापूर, मुंबई, भूज, कलकत्ता, श्रीरामपूर व अमेरिका अशी यात्रा करून आनंदीबाई अखेर स्वत्व गमावून बसली ती कुठे, तर ज्या घरी ती जन्मास आली होती त्याच बाळशास्त्री माटयांच्या घरी !

कादंबरीकाराला तिच्या चरित्रातील हा बंध दिसला असता तर ही कादंबरी एक श्रेष्ठ शोकात्मिका झाली असती परंतु आनंदीबाईच्या चरित्रातील दुःखाची ही अपरिहार्यता लेखकाला जाणवलेलीच नसल्यामुळे ती होते 'कारुण्याने ओथंबलेली' एक कहाणी !

[ संपूर्ण ]



# खाणं

....राक्षसासारखं याला खायला हवं मागल्या जन्मी मेला बकासूर होता की काय नकळे!....खायला....खायला करून माझ्या अन्नूचं खोबरं करून खिरापत वाटली नाही म्हणजे मिळवली—आमची मातृदेवता गरजली

देवबागेहून गुजामावशीचे पत्र आले होते. गुजामावशीच्या अंकुशाचे लग्न ठरले होते. मावशीने जावयाना लिहिले होते—

'सोमवारास सांवामामा बोटीत बसून मुंबैस निघतो आहे. आठवडयाभरात पुन: देवबागेस परतायास तो निघेल. काशेस नि मुलांस त्याचे बरोबर लावून द्यावे

जावई पत्र वाचून दाखवीत होते. जावई म्हणजे आमचे वडील. तुम्हाला प्रश्न पडला असेल. आमचे वडील आमच्या मावशीचे जावई कसे ? तर त्याचे असे आहे— गुजामावशी आमची मावशीच नाही आहे.

म्हणजे गुजामावशी आमच्या आईची मावशी. म्हणजे आम्ही तिचे नातू. म्हणजे गुजामावशी आमची आजी. पण आम्ही कुणी तिला आजी म्हणत नाही. कुणीच गुजामावशीला दुसरे काही म्हणत नाही. तिच्याबद्दल बोलताना सगळे तिला गुजामावशीच म्हणतात. ती समोर असेल तेव्हा नुसतेच मावशी म्हणतात. खुद्द मावशीचा अंकुशा गुजामावशीला आई म्हणत नाही. मावशीच म्हणतो.

आमची आई सांगते—'शांतीताईची थोरली आता बाळंत व्हायला झाली आहे.' शांतीताई म्हणजे आमची थोरली मावशी. म्हणजे खरोखरीची हो. गुजामावशी-सारखी नाही. आणिक एक आहे. मालाडची. ती धाकटी मावशी.

तर आई म्हणते शांतीताईची थोरली आता बाळंत झाली की गुजामावशीला पणतु होईल. मावशीचा हा पणतु देखील तिला गुजामावशीच म्हणेल.

यावर मी आईला म्हणालो—

'कायतरीच सांगतेस. शांतीताईच्या मथुआक्काला बाळ झाले तर त्याला आधी लगेचच्या लगेच बोलायला कसे येईल ? नि मथुआक्काला मुलगाच तरी कशावरून होईल ? मुलगीसुद्धा होईल तो गुजामावशीची कोण—पणती ?'

यावर आई म्हणाली होती—

'ये मेल्या तुझ्या थोबाडाला आग लावते. अवलक्षणी मेला. मथुला. मु... तर होऊ देत चांगला डागच देते बघ तुझ्या जिभेला कसा

आमची आई तरी चमत्कारीकच आहे कुणी बाळंत व्हायला आले की ही आपली तिला मुलगा होण्याचीच वाट पहात बसते माझेतरी चुकलेच कसे. मीच मुलगी

अनुक्रमणिका

व्हायला पाहिजे होतो अशी जिरली असती कीनई आईची तरी.

आणि आई तरकटीच आहे मी जरा काही बोललो की माझ्या तोंडाला आग लावायला धावते. आग लावायची नसते तेव्हा ती मला राक्षस म्हणते वकासूर म्हणते.

आता जावई गुजामावशीचे पत्र वाचून दाखवीत होते ना म्हणजे आमचे वडील हो ! मावशी आमच्या वडलांना जावई म्हणते ते मला खूप आवडते. आपण पण त्यांना जावईच म्हणावेसे मला वाटते. पण आई लाकूड घेऊन धावेल म्हणून तसे मोठचाने म्हणायचे नाही.

तर जावई गुजामावशीचे पत्र वाचून दाखवीत होते तर एकदम आईचे सुरू झाले—

"सांगून ठेवते तुम्हाला ह्या ह्या तुमच्या पोरटचाला कशी ती आधी थोडी रीत सांगून ठेवा. कुठे कसे वागावे मेल्याला कुठल्या जन्मी कळायचे आहे कुणास कळे ? राक्षसासारखे याला खायला हवे मागच्या जन्मी मेला वकासूर होता की काय नकळे ! गुजामावशीकडे लगीन घर जमायचेय. खायला खायला करून माझ्या अब्रूचे तिथे खोबरे करून खिरापत वाटू नकोस म्हणावे. "

गुजामावशीच्या परडयातल्या नारळीला हा ऽऽ अेवढाला एक एक नारळ लागतो तिथे खिरापतीला आईची अब्रू कोण कशाला मागणार आहे ? उगाच आपले काहीच्या वाही बोलायचे ?

आता मला खायला खूप लागते हे खरे आहे. पण भूक लागल्यावर खायचे नाहीतर काय करायचे? नि ज्याला परसाकडला साफ होते त्यालाच भूक लागते त्याला मग कधी आजारी पडायला होत नाही असे गुजामावशी सांगते. आणिक माझ्या खाण्याबद्दल बोलायचेच तर आईला तरी नेमका बकासूरच का सापडतो ? त्या भीमाने देखील गाडीभर अन्न खाल्ले होते. मग भीमासारखा खातो म्हणायला हिचे काय जाते ? पण नाहीच म्हणायची कधी. गुजामावशीला मी ती गोष्ट मोठचानी वाचून दाखवली होती.

ती म्हणाली होती

'असेच भीमासारखे खावे नि लठ्ठ व्हावे.'

मात्र जावयांचे वरे आहे. आई काही बोलली तरी ते तिच्याकडे लक्ष देत नाहीत. मग आईच बोलून बोलून कंटाळते. बोलायची थांबते. किंवा बोलतच राहीली तरी दुसरे काहीतरी बोलू लागते. आतादेखील तसेच झाले. ती माझ्या नावाने वडबड करून आपणच थांबली. मग जावयांनी पुनः पुढे मावशीचे पत्र वाचून दाखवायला सुरवात केली.

## सुरेश वेंगुर्लेकर

मावशीने पुढे लिहिले होते—

'भायखाळचाच्या नि मालाडच्या जावयाना देखील अशीच पत्रे घातली आहेत. तर तुम्ही जावयांनी कामाधंद्यातून सवड काढून लग्नाच्या वेळी यावेच. पण मुलाबाळांना नि त्यांच्या आयांना सांबामामाबरोबर धाडून द्यावे. लगीन घर आधी पोराबाळांनी वाजायगाजायास हवे. मागून ब्यांड-ताशे.

मी वोटे घालून मोजायला सुरवात केली आम्ही सहा भावंडे. शांतीताईची सात अधिक मालाडच्या मावशीची चार. म्हणजे सगळी मिळून सतरा. पुनः मोजली ..बरोबर सतराच. आणिक वायंगणकरांच्या घरातली मुले गुजामावशीच्या परडयात आमच्याबरोबर खेळायला येतील ती निराळीच. म्हणजे लहानगे बाजूला केले तरी गुजामावशीच्या परडयात हुतुतू खेळायला सहज दोन टीमा होतील. 'टुण् टुण तारे लत्ती घोडा मारे ऽऽ जांबुळके झाडमे कितना हंडी है ?' खेळायला तर खूपच मजा येईल.

आणि खेळताना मध्येच खिशातून काय काय काढून खायचे. आंबे पोळी. फणस पोळी. गुळदाणे काजूचे लाडू शेवांचे लाडू फणसाच्या आठाळचा. अकरा वाजता गुजामावशी पेज खायला बोलावते. आमच्या पेजेच्या भांडचात ती एवढा-एवढाले शहाळचाचे खोवरे घालते. कधी कधी पेजेबरोबर खारवलेली कैरी. आंबोशी नाहीतर कच्च्या फणसाची भाजी असते. कच्च्या फणसाची भाजी तर गुजामावशी अशी टेसदार करते कधी एकदा बोटीत वसून गुजामावशीकडे पोहोचतो असे मला होते.

बोटीत खाण्यासाठी आईने पुरीभाजी करून घेतलेली असते. शांतीताईने शिरा करून पाठविलेला असतो. मालाडच्या मावशीने प्लॅस्टीकच्या कागदात गुंडाळलेले मोठ्ठाले चार केक नि फळे आणलेली असतात. पण भाऊचा धक्का दिसेनासा होऊन बोट वेगाने पाणी कापू लागते तशी एक एक जण डोके धरून आडवे व्हायला सुरवात करतात. सांबामामाला मात्र काही होत नाही. मला तर काहीच होत नाही. मी खातो. बोटीभर सगळीकडे फिरतो. पुनः येऊन खातो. आई मालाडच्या मावशीला म्हणते—

"वच्छे, अन्न पाण्यात टाकून द्यायची वेळ बिलकूल यायची नाही हो. समुद्राच्या पोटात रहायचे नाही एवढे या राक्षसाच्या पोटात मावेल."

'राक्षस ... राक्षस काय करतेस ! मी भीमासारखे लठ्ठ व्हायचे ठरवले आहे. गुजामावशीनेच तसे सांगितले आहे...' वगैरे मला आईला ऐकवायचे असते. पण तोंडातला केकचा बकवा मला तसे करू देत नाही. शिवाय आणिक एक शंका येते लठ्ठ होण्यासाठी भीम केक खात होता काय ? मला खात्रीचे उत्तर सापडत नाही. म्हणून मग मी आईला काही ऐकवायचा बेत सोडून देऊन नुसताच केक खात रहातो. शिवाय पोट गच्च झाले आहे. एकदा परसाकडला जाऊन








यायला हवे. त्याशिवाय आणिक खायला मजा यायची नाही. मी उठून सरळ बोटीतल्या संडासाकडे जातो.

भल्या पहाटे बोट मालवण बंदरात उभी रहाते. मी जाम झोपलेला असतो. गदागदा हालवून मला उठविण्यात येते. जाग आल्यावर मी बोटीत असल्याचे लक्षात येते. आश्चर्य वाटते. काय मजा आहे – झोप लागली की आपण कुठे आहोत हे देखील विसरायला होते. तेवढ्यात एक शंका येते आपण जाम झोपलो होतो. उठल्यावर या लोकांनी काही खाल्ले-विल्ले असेल तर ? मालाडच्या मावशीच्या पम्याला मी विचारतो ––

" पम्या तुम्ही काही खाल्ले कायरे ?"

यावर पम्याचे आपले बाजूला जाऊन वॉ ऽऽक. मावशी त्याचे डोके धरायला धावते नि दुसऱ्या हाताने आपलेच डोके धरून त्याच्या शेजारी बसते. सगळा वैताग. मी तडक सांबामामा असतो तिकडे जातो. सामान पडावात उतरवीत असतात त्यावर तो लक्ष ठेवून असतो.

बंदरावर आम्हाला घ्यायला गुजामावशीचा अंकुशा आलेला असतो. धावत जाऊन सगळ्यांच्या आधी मी अंकुशमामाला गाठतो. तो विचारतो–

" काय रे गजा ऽऽ डोकी गरगरतां काय ? कितींदा बोकलस बोटयेत !"

मी म्हणतो ––

"हु ऽऽ ऽ. मी तर चांगला खात होतो नि बोटीभर हिंडत होतो. विचार पाहिजे तर सांबामामाला."

तर तो म्हणतो

"तर मगे तुका जिजिर नुको

हे काय झाले ? मला काय ठाऊक हा जिजीर मागवणार होता ते ? पण तेवढ्यात लटपटत सगळी जणे अंकुशमामापाशी पोचतात नि मग सगळ्यांसाठी तो जिजीर मागवतो. सगळ्यांबरोबर माझ्यासाठीही मागवतो.

अंकुशमामा नि सांबामामा छकडे ठरवतात. आम्ही छकड्यात बसून समुद्राच्या काठाने वेळेवरून देववागेकडे निघतो. छकडे वाळूवर चाकांचे पट्टे उठवीत जोरात देववागेकडे पळू लागतात.

छकडे देववागेत पोचतात तेव्हा वाळूच्या टेंव्यावरून सकाळचे ताजे ताजे ऊन सांडलेले असते. त्या सोनेरी उन्हात डोळ्यांवर हात घेतलेली नि पदर वाऱ्यावर फडफडत असलेली एक आकृती दिसू लागत मी ओळखतो ती गुजामावशी असते.

ताडकन छकड्यातून उडी घेऊन मी छकड्यांच्या पुढे पळत सुटतो. मावशीही टेंवे उतरू लागते. मी अर्ध्यावरच मावशीला गाठतो. तिच्या कमरेला मिठीच घालतो.

मग बाकीचीही येऊन पोचतात. सगळीच जणे गुजामावशीला धरू पहातात. त्यांना आवरता आवरता टेंव्यावरच्या वाळूत मावशीची पावले लटपटू लागतात आई, मालाडची मावशी ओरडते––,

" रे ऽऽ थांवा. थांवा. पाडाल तिला."

मावशी त्यांना म्हणते ––

"पाडू देत गो ऽऽ. .थोरांनी पडावे पोरांनी वाढावे. " आमच्याशी गुजामावशी चक्क आमच्यासारखे बोलते. सांबामामाशी अंकुशमामाशी 'माका-तुका' करते.

पोरांच्या मावशीच्या आईच्या सगळ्यांच्या पाठीवरून डोकीवरून. चेहेऱ्यावरून प्रेमाने चाचपडून झाल्यावर माझ्या खांद्याला नेट देऊन टेंव्याच्या वाळत पावले रोवीत मावशी मला म्हणते ––

" चल रे माझ्या भीमा.

माझ्या अंगात खरेच भीमाचे बळ येते.

घरात शिरल्यावर सारीजणे इकडे तिकडे टेकतात. मी मात्र गुजामावशीच्या मागे मागे करीत रहातो. मग मावशी मला एक एक काम सांगते.

" गजारे ऽऽ "

" काय मावशी ?"

" दुकानावर तुझी मामी बसली आहे. तिला म्हणावे चहात घालायला मावशेन गुळाचा खडा मागीतलाहे. "

गुजामावशीच्या ओटीवर अर्ध्या जागेत तिचे किराणामालाचे दुकान आहे. दोघेही मामा बाहेर असले की सांबामामाची बायको दुकानावर बसते. मी दुकानात शिरताच ती मला विचारते–,

" काय गजा कशी हा मुंबै ?"

मी म्हणतो––

"बरी आहे."

मग मी तिला मावशीने चहासाठी गुळाचा खडा मागितल्याचे सांगतो. मामी म्हणते,



अनुक्रमणिका

"कोठ्येतसून घेव्न् जा."

दुकानाला लागूनच आत मालाच्या कोठीची खोली आहे. कोठीत एवढ्या मोठ्ठाल्या गुळाच्या ढेपी. इतका गूळ पाहून माझ्या तोंडाला पाणी सुटले. पण ढेपी फोडायला काही सापडेना. ढेपीवर एक जुने लोखंडी वजन होते. पण खिळा कुठे दिसेना. नुसत्या वजनाने ढेप काही केल्या फुटेना. इतका गूळ समोर असताना मला धीर धरणे अशक्य झाले. मी सरळ सरळ ढेपीला ढासच मारला. दाताने ढेपीचा भला चांगला खडा काढला आणि धापकन् पाठीत धपाटा बसला.

आई कधी मागे येऊन उभी राहिली होती कळलेच नाही. तिच्या त्या धपाट्या-सरशी माझ्या तोंडातला गुळाचा खडा जमिनीवर पडला. आईने माझे बकोट धरले नि एका मागून एक धपाटे ती घालीतच राहिली. धपाटे घालतानाच तोंडाने म्हणाली—

"खा ऽऽ खा ऽ मेल्या आता किती खातोस तेवढे."

मी मोठ्ठ्याने बोंब ठोकून दिली.

गुजामावशी धावून आली. दुकानातून मामीही आली. दोघींनी मला आईच्या हातून सोडवले. आईला रागावीत गुजा-मावशी म्हणाली—

"काय झाले गो काशे ही काय तुझी रीत पोराला मारायची ?"

"आधी पराक्रम बघ त्याचे. ढेपीला ढासच मारलान की गे राक्षसाने. बघ केवढा खडा काढलान आहे तो तरी "

मावशीने ढेपेकडे पाहिले नि ती पोट धरून हसून लागली. मग मला म्हणाली—

"होय रे गजा ढास मारलास ढेपेस ?"

मी म्हणालो—

"ढेप फोडायला कायपण सापडले नाही. मग काय करायचे ?"

यावर मावशी बरोबर मामीही हसू लागली.

मग ढेपांच्या गर्दीतून मामीने कुठून तरी खिळा शोधून काढला. ढेप फोडली. जमिनीवर उडालेला माझ्या तोंडातला खडा मावशीने उचलून माझ्या हातावर ठेवला. ढेप फोडताना मुद्दाम पाडलेला आणिक एक तुकडा मामीने दिला. आईने मला शिव्या घालीत गुजामावशीचे घर डोक्यावर घेतले. पण तिच्या शिव्या ऐकायला मी घरात थांबलोच नाही. माझ्या हाती एक सोडून दोन गुळाचे खडे पडले होते.

गुजामावशीच्या परड्यात दिवसभर हुतूतू. . .हमामा घालण्यात. .जांभळी-खालून आंब्याखालून— काजींतून हिंडण्यात, कधी गुजामावशीबरोबर तरीवर मुळे रापायला जाण्यात दिवस चट चट संपू लागले. रात्री गुजामाव-शीच्या गोष्टी ऐकता ऐकता सारीजणे झोपली तरी मी लवकर झोपायचा नाही. मावशी म्हणायची—

"आता नीज की रे गजा."

मी म्हणायचो.

"तू अजून ती वाघाची गोष्ट कुठे सांगितलीस ! मग मी इतक्यांदा एकलेली ती गोष्ट गुजामावशी पुनः सांगू लागा-यची—

"तर वर कारे गजा ऽऽ तेव्हा मी नुक-तीच लग्न होऊन या घरात आलेली नवरी मुलगी होते. तरीवर परसाकडला जायची मला लाज वाटायची. मग मी तिकडे लांब डोंगराकडे तांब्या घेऊन जायची. .

मला सगळी गोष्ट पाठ होती. तरीही मावशीचा शब्दन् शब्द मी नव्याने ऐके. ऐकताना मावशी मला नवी नवरी दिसू लागे. तांब्या घेऊन डोंगराकडे जातानाची नवरी दिसू लागे. "तांब्या खाली ठेवून मी जरा वर पहाते तर डोंगरावरून हे ऽऽ एवढाले महाराज उतरताहेत. . म्हटलेन् की डोंगरावरून उतरणारा वाघ चक्क डोळ्यापुढे येई. छाती धड-धडू लागे. . .त्याला पाहून तांब्या टाकून पळून आल्याचे मावशी सांगे तेव्हा माझी हसता हसता मुरकुंडी वळे. 'आणि अशी पळून घरी येते तर दारात दुसरा वाघ उभा.' म्हटलेन् की दारात उभे राहीलेले उंचेपुरे मोठ्या-मोठ्या मिशांचे आजोबा दिसू लागत. तांब्या टाकून पळून आल्याबद्दल गुजामाव-शीला ते रागावत, पायात पायताण सर-कवून नि हातात सोटा घेऊन मावशी-बरोबर निघत. आजोबांच्या पायताणाचा आवाज ऐकूनच वाघ पळून जाई नि तांब्या घेऊन मावशी घरी परते. गोष्ट संपताना मावशी म्हणे—

"गजा—तुझ्या आजोबांचा दंड ह्या ऐवढाला एक एक होता. . .भीमासारखा. तू देखील त्यांच्या सारखाच हो वरे

"पण मावशी भीमासारखे व्हायचे म्हणजे खूप खूप खायला हवे की नाही ?"

"तर ! खायला हवेच खूप."

मग मला आईच्या तरकटीपणाचे काही वाटत नसे. बघता बघता पटकन् झोप लागत असे.

अंकुशमामाचे लग्न झाले. तेव्हा मला वाटले ही नवी नवरी आता तांब्या घेऊन डोंगराकडे जाईल. पण ती तरीवरच तांब्या घेऊन जाऊ लागली. मला वाईट वाटले. गुजामावशीला खूपच वाईट वाटले असणार हेही लक्षात आले. अंकुशमामाच्या बायकोचा मला रागच आला. त्या रागाच्या भरात मी ठरवून टाकले. काही नाही. आपणच आता भराभर मोठे व्हायचे. आजोबांसारख्या मोठ्ठाल्या मिशा ठेवायच्या त्यांच्यासारखे .भीमासारखे दंड तयार करायचे नि मावशीच्या याच घरात नवरी करून आणून तिला तांब्या घेऊन डोंगराकडे पाठवायाचे.

त्या रात्री स्वप्नात तांब्या घेऊन डोंग-राकडे निघालेली माझी नवरी मी चक्क डोळ्यांनी पाहिली. गुजामावशीच्या दाराशी सोटा ठेवून, ती तांब्या टाकून पळून येईल म्हणून दारात वाट पहात उभ्या असलेल्या मला देखील मी पाहिले.

उठल्यावर हे आठवले तेव्हा स्वतःशीच मी म्हणालोही 'जय भीम' !

• • •

जगातले इतर देश काही दिवसात चंद्रावर सुद्धा पोचतील-पण भारत मात्र अजून अणुबॉम्ब करावेत की न करावेत यातच गुरफटलेला दिसतो......



चीनने ऑक्टोबर १९६४ मध्ये अणुबॉम्बचा स्फोट करून अण्वस्त्र निर्मितीला सुरुवात केली. अर्थात या अण्वस्त्र निर्मितीचे भारतावर परिणाम होणार असल्यामुळे आपण अण्वस्त्र निर्मिती करू की करू नये या वादंगाला त्यावरोबरच जोरदार सुरुवात झाली. या वादात सामान्य नागरिकांपासून मोठ्या शास्त्रज्ञांपर्यंत सर्वांनी वेळोवेळी मते प्रदर्शित केली आहेत. सध्यातरी भारत सरकारचे धोरण अण्वस्त्र निर्मिती करू नये असेच आहे. इतकेच नव्हे तर आम्ही अणूचा उपयोग फक्त शांततेकरताच करणार आहोत असेच जगाला आजपर्यंत सांगत आलो आहोत. अण्वस्त्र निर्मिती करावी अगर करू नये हा प्रश्न राष्ट्राची सुरक्षितता नजरेसमोर ठेवून आर्थिक, राजकीय व तात्त्विक दृष्टीकोनातून विचार करूनच आपणास सोडवावयाचा आहे.

प्रथम आपण अण्वस्त्र तंत्राची थोडक्यात ओळख करून घेऊ. अणुबॉम्बकरिता ज्या मूलद्रव्याची जरुरी असते ते मूलद्रव्य म्हणजे युरोनियम–२३५ होय. तसेच अणुबॉम्ब हा प्लुटोनियम व हायड्रोजन या मूलद्रव्यापासूनही वनविला जातो. युरोनियम–२३५ हे नैसर्गिक युरोनियममध्ये अगदी अल्प प्रमाणात असते. युरोनियम–२३५ हे नैसर्गिक युरोनियमपासून वेगळे करण्याकरिता विशिष्ट रासायनिक प्रक्रियेची जरुरी असते व ही प्रक्रिया गॅसिअॅस डीफ्युझन प्लॅन्टतर्फे केली जाते. हा प्लॅन्ट उभारण्याकरिता फार मोठा खर्च येतो. तसेच हा प्लॅन्ट उभारण्याविषयी जे तंत्र आहे ते जगातील फार थोड्या देशाना अवगत झाले आहे. आज जी राष्ट्रे अण्वस्त्रधारी आहेत तसेच जी अण्वस्त्र निर्मिती करण्याच्या तयारीत आहेत अशा राष्ट्रानाच हे तंत्र पूर्ण अवगत झाले आहे.

बॉम्बचा स्फोट झाल्यानंतर जी उष्णताशक्ती निर्माण होते ती टी. एन. टी. ( Trinitrotoluence) या प्रमाणात मोजली जाते. परंतु अणुबॉम्बची शक्ती ही किलो टन व मेगॅटन या प्रमाणात मोजली जाते. किलोटन ही फार भयंकर शक्ती आहे. हिरोशिमावर टाकलेला अणुबॉम्ब हा २० किलोटन शक्तीचा होता. ( १ किलोटन १००० टन– टी. एन. टी. ) हिरोशिमा व नागासाकीच्या स्फोटानंतर गेल्या वीस वर्षात अणुबॉम्बचे अनेक चाचणी प्रयोग करून ती उष्णताशक्ती बऱ्याच पटीने मेगॅटनपर्यंत वाढविण्यात आली आहे. ( १ मेगॅटन १०,०००,००० टन टी. एन. टी. ) २० किलोटनच्या बॉम्बला 'टॅक्टीकल वेपन' व मेगॅटनशक्तीच्या बॉम्बला 'स्ट्रेटेजिक वेपन' असे म्हणतात. अमेरिका-रशिया व इंग्लंड या राष्ट्रांजवळ एक मेगॅटनपासून ५० मेगॅटनपर्यन्तचे अणुबॉम्ब त्या राष्ट्रांच्या शस्त्रसंभारात साठविलेले आहेत. म्हणजेच पुढेमागे जर या दोन राष्ट्रात अण्वस्त्राचे युद्ध झाले तर सवंध जग व मानव संस्कृती नष्ट होऊन जाईल इतके सामर्थ्य या दोन बलाढ्य राष्ट्रांजवळ आहे, असे अनुमान काढल्यास ते अतिशयोक्तीचे होणार नाही.

## आत्माराम ज. वाळींजकर

अण्वस्त्र निर्मिती करण्याइतकेच ती अण्वस्त्रे आपल्या लक्ष्यावर नेऊन आदळविणे हेही महत्त्वाचे आहे. यालाच अण्वस्त्र–वाहिका ( Delivery-System ) असे म्हणतात. सध्या अस्तित्त्वात असलेल्यापैकी दोन साधनानी अणुबॉम्ब आपल्या लक्ष्यावर नेता येतो. ज्या राष्ट्रांची अण्वस्त्र निर्मितीला नुकतीच सुरुवात झाली आहे, अशा राष्ट्रांची सर्वसाधारण पहिली अवस्था म्हणजे बॉम्बफेकी विमानातून अणुबॉम्ब नेणे. हिरोशिमा व नागासाकीवर टाकलेले अणुबॉम्ब हे बी–२९ ह्या साध्या बॉम्बफेकी विमानातून नेले होते. आजसुद्धा जगातील अत्याधुनिक विमानामध्ये अमेरिकेचे स्ट्रॉटोफोर्ट्रेस बी–५२, बी–५८ ( हसलर ), एफ्–१११ बी, व फॅंटम–२ रशियाचे ब्लाइंडर व बाडगर, ब्रिटिशांचे व्ही बॉम्बर, टि. एस. आर.–२, ( टॅक्टीकल बॉम्बर) व फ्रेंचांचे




मॅयरेज–४ ही जगातील स्वनातीत वेगाने अणुबॉम्ब नेऊ शकतील अशी अत्यंत सुसज्ज व दर्जेदार लढाऊ विमाने म्हणून ओळखली जातात. अणुबॉम्ब वाहिकेचा दुसरा टप्पा म्हणजे क्षेपणास्त्रे होत. ही क्षेपणास्त्रे साधारणतः तीन वर्गात विभागता येतील. पहिल्या विभागात 'मध्यम पल्ल्याच्या क्षेपणास्त्राचा' उल्लेख करता येईल. ( Medium Range Ballastic Missile ) ही क्षेपणास्त्रे साधारणतः ५०० ते १५०० मैलांमधील लक्ष्ये गाठू शकतील. दुसरा टप्पा 'मध्य पल्ल्याच्या क्षेपणास्त्रांचा' होय. ( Intermediate Range Ballastic Missile ) ही क्षेपणास्त्रे १५०० ते ५००० मैलामधील लक्ष्ये गाठू शकतील. तर शेवटच्या टप्यात 'खंडार्गत क्षेपणास्त्रांचा' उल्लेख करता येईल. ( (Intercontinental Ballastic Missile ) ही क्षेपणास्त्रे ६००० मैलांमधील जास्त पल्ल्याच्या लक्ष्यावर धडक मारू शकतात. अशी खंडार्गत क्षेपणास्त्रे फक्त अमेरिका व रशियाजवळ आहेत. अमेरिकेजवळ खंडार्गत क्षेपणास्त्रे तीन प्रकारची आहेत — मिनूटमन–१, ॲटलास व टीटान–१ ही क्षेपणास्त्रे ६००० मैलांमधील लक्ष्यावर धडक मारू शकतात. मिनूटमन–२ हे क्षेपणास्त्र ९००० मैलांमधील लक्ष्यावर धडक मारू शकते, तर मिनूटमन–३ व टीटान–२ ही क्षेपणास्त्रे १२००० मैलावरील लक्ष्यावर धडक देऊ शकतात. रशियाच्या शस्त्रसंभारातही अशा सर्व प्रकारची क्षेपणास्त्रे आहेत. त्यातील महत्त्वाची म्हणजे टी–३ व एम– १०४ ही क्षेपणास्त्रे ८००० मैलांवरील कोणत्याही लक्ष्यावर अचूक मारा करू शकतात. तसेच ही क्षेपणास्त्रे ३० मेगॅटनच्या बॉम्बनी सुसज्ज केली आहेत. यावरून या दोन वलाढ्य राष्ट्रांनी क्षेपणास्त्रात किती प्रगती केली आहे हे सहज समजून येईल.

**अण्वस्त्रनिर्मितीचा अजस्र खर्च—**

अण्वस्त्र निर्मितीचा खर्चही जबरदस्त असतो हे लिनार्ड विटन यानी जो अण्वस्त्र निर्मितीच्या खर्चाचा अंदाज सांगितला आहे त्यावरून आपणास सहज कल्पना येईल. त्यातील प्रमुख आकडे खालील प्रमाणे आहेत :— (१) ॲटॉमिक रिॲक्टर व सेपरेशन प्लॅन्ट १०० मिलीयन डॉलर किंवा ७५ कोटी रुपये, (२) फीझल मटेरिअल २०० मिलीयन डॉलर किंवा १५० कोटी रुपये. (३) अण्वस्त्रे व त्यांचे स्फोट करून त्यांची कसोटी पहाणे ५०० मिलीयन डॉलर किंवा ३७५ कोटी रुपये, (४) रॉकेटच्या विकासाकरिता ८०० मिलीयन डॉलर किंवा ६०० कोटी रुपये तर खंडार्गत क्षेपणास्त्राच्या विकासाकरिता ७०० मिलीयन डॉलर किंवा ५२५ कोटी रुपयांइतका खर्च करावा लागेल. हा सर्व खर्च १७२५ कोटी रुपयांचा आहे. म्हणजेच अण्वस्त्राच्या कार्यक्रमावर १८०० कोटी रुपयांची तरतूद असणे आवश्यक आहे.




अण्वस्त्र हल्ल्याचा सर्वात मोठा धोका आपल्याला लालचीनकडून आहे. म्हणून आपण चीनच्या अण्वस्त्र प्रगतीकडे बारकाईने लक्ष ठेवले पाहिजे. इ. स. ७०० च्या सुमारास चीनमध्ये वंदुकीच्या दारूचा शोध लागला व त्यानंतर पाश्चिमात्य राष्ट्रांनी त्या दारूचा उपयोग युद्धात करावयास सुरूवात केली. त्यानंतर १२६४ वर्षांनी म्हणजे १९६४ मध्ये अण्वस्त्राचा पहिला स्फोट करून चीनने अणुक्षेत्रात प्रवेश केलेला आहे १९६४ मध्ये केलेला पहिला अण्वस्त्राचा स्फोट २० किलोटनचा होता. व तो हिरोशिमावर टाकलेल्या बॉम्बच्या वर्गातील होता. त्यानंतर चीनने १३ मे १९६५ रोजी २० ते २०० किलोटन बॉम्बचा स्फोट करून पहिल्यापेक्षा जास्त प्रभावी अण्वस्त्र निर्माण करण्याची मनीषा प्रदर्शित केली. त्यानंतर तिसरा स्फोट ९ मे १९६६ रोजी केला व चौथा स्फोट २८ डिसेंबर १९६६ रोजी करून त्यावेळी प्रथमतः क्षेपणास्त्राचा चीनने उपयोग केला आणि आपण क्षेपणास्त्रातही जलद प्रगती करीत आहोत हे जगास सिद्ध करून दाखविले. परंतु २८डिसेंबर १९६६ रोजी केलेला अण्वस्त्र स्फोट हा महत्त्वाचा होता कारण तो हायड्रोजन बॉम्बचा होता. तो हायड्रोजन बॉम्ब कमी शक्तीचा होता इतकेच. १७ जून १९६७ रोजी केलेला सहावा स्फोट बॉम्बफेकी विमानाच्या सहाय्याने घडवून आणला. हा हायड्रोजन बॉम्ब पाचव्या स्फोटापेक्षा अधिक प्रभावी शक्तीचा होता. अशा तऱ्हेने फार मोठी मजल अण्वस्त्र निर्मितीत चीनने फार थोड्या अवधीत घडवून आणून सर्व जगाला विस्मयचकीत करून सोडले आहे. यावरून चीन कमी शक्तीच्या हायड्रोजन बॉम्बपासून जास्त शक्तीच्या ( मेगॅटन शक्तीच्या ) बॉम्बकडे सध्या वाटचाल करीत आहे असे आपणास कळून येईल.आतापर्यंतच्या एकंदर प्रगतीवरून चीन वर्षाला ४० अणुबॉम्ब तयार करीत असून सध्या चीनजवळ १०० पेक्षा जास्त अणुबॉम्बचा साठा असावा असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. १९७० च्या सुमारास चीन ४००/५०० किलोटन शक्तीचे म्हणजेच अर्धा मेगॅटन शक्तीचे अणुबॉम्ब सहज करू शकेल असे अमेरिकन अणुतज्ज्ञाना वाटते.

# अथवा, एका तेलशुद्धीकरण कारखान्या मार्फत दोन कारखान्यांचं काम करून घेण्याची खुबी.




नवे तेलशुद्धीकरण कारखाने उभारण्यांच्या गोष्टी बोलायला ठीक. पण त्यांत ३० ते ४० कोटी रुपयांचा भुर्दंड आहे. पेट्रोलियमजन्य पदार्थांची मागणी आजच्या १४० लक्ष टनांवरून १९७५ च्या सुमारास ३०० लक्ष टनांवर जाईल. ती पुरी करण्यासाठी देशाला केवढा खर्च येईल याची कल्पना आहे? १६० लक्ष टनांच्या शक्तीचा तुटवडा भरून काढण्याची ही समस्या म्हणजे मानवी कर्तृत्वाला आव्हान आहे.

तेल "शुद्धीकरणाची"च समस्या घ्या ना. नवे कारखाने उभारल्याशिवाय भारताला आपली तेलशुद्धीकरणाची क्षमता दुप्पट करता येईल काय? जरूर... सार्वजनिक तसेच खाजगी क्षेत्रातील कारखान्यांचा विस्तार केल्यास प्रत्येक कारखाना दोन कारखान्यांचे काम सहज करील. उदाहरणार्थ, एस्सोच्या मुंबईतील तेलशुद्धीकरण कारखान्याचा विस्तार केल्यास केवळ $\frac{1}{3}$ खर्चात एक संपूर्ण नवीन कारखाना उभारल्या इतकाच फायदा होईल.

एस्सो आहे व्यापारी संस्था. भारताचे हित तेच तिचेहि हित. १६० लक्ष टनांचा तुटवडा भरून काढण्याच्या कामात सर्वांनाच सहभागी होता येईल. सद्य:परिस्थितीत भांडवल, यंत्रसामग्री व अनुभवी तंत्रज्ञ, आणि कामगार यांचा जास्तीत जास्त व उत्तमात उत्तम उपयोग करून घेतला पाहिजे. पुढे येणाऱ्या जबाबदाऱ्यांमधून आपल्या वाट्याचे ओझे उचलण्याची एस्सोची तयारी आहे.

## एस्सो शक्तीची तूट भरून काढण्यास हातभार लावू शकेल.




CHEPR-3-304 MR

दुसरी महत्त्वाची वर उल्लेखिलेली घटना म्हणजे चीन क्षेपणास्त्रात करीत असलेली प्रगती होय. चीनचा वार्षिक संरक्षण खर्च ४८०० कोटी रुपयांचा असून त्यापैकी ३५० कोटी रुपये फक्त क्षेपणास्त्रांच्या कार्यक्रमावर चीन दरवर्षी खर्च करीत आहे, हे येथे लक्षात घेण्यासारखे आहे. २८ डिसेंबर १९६६ रोजी क्षेपणास्त्राच्या सहाय्याने केलेला स्फोट चीनच्या अण्वस्त्राच्या इतिहासात महत्त्वाचा ठरणारा आहे. हा चाचणी प्रयोग ५००/७०० मैलाचा टप्पा गाठणाऱ्या क्षेपणास्त्राचा होता. म्हणजे सध्या चीन 'मध्यम पल्ल्याच्या' (MRBM) क्षेपणास्त्रावर लक्ष केंद्रीत करीत आहे. हा पहिला टप्पा जर चीनने लवकर गाठला तर १९७० च्या सुमारास 'मध्यम पल्ल्याचे' (IRBM) म्हणजे १५०० ते ५००० मैलांमधील लक्ष्य गाठणारे क्षेपणास्त्र चीन तयार करू शकेल. १९७२ नंतर चीन खंडांर्गत क्षेपणास्त्राच्या (ICBM) तयारीस लागेल व मेगॅटनशक्तीचे हायड्रोजन बॉम्बही चीन याच सुमारास करू शकेल असा अमेरिकन अणुशास्त्रज्ञांचा अंदाज आहे. जर चीनने १९७० / ७२ च्या दरम्यान ६००० मैलांमधील खंडांर्गत क्षेपणास्त्रे बनविली तर अमेरिका, रशिया, इंग्लंड, फरान्स इत्यादि राष्ट्रे चीनच्या क्षेपणास्त्राच्या माऱ्याच्या टप्प्यात येऊ शकतील. म्हणूनच अमेरिकेने आपल्या शहराच्या संरक्षणाकरिता "अण्वस्त्रविरोधी पातळ पडदा" (Thin Anti-Ballastic Missile System) उभारण्यास सुरुवात केली आहे. चीनच्या मध्यम व मध्य पल्ल्याच्या क्षेपणास्त्राच्या माऱ्याच्या टप्प्यात येणारे देश म्हणजे जपान, तैवान (फोर्मोसा), फिलीपाइन्स, आऊटर मंगोलिया, मलेशिया, इंडोनेशिया, सीलोन आणि भारत हे होत.तसे पाहिले तर चीनने जेव्हा पहिला अण्वस्त्राचा स्फोट करून अण्वस्त्रे आपल्या शस्त्रसंभारात जमा करण्यास सुरुवात केली तेव्हाच भारताला अण्वस्त्राचा धोका निर्माण झालेला आहे. कारण चीनचे बहुतेक हवाई तळ आपल्या उत्तर सीमेला अगदी लागून असल्यामुळे कलकत्ता, दिल्ली, लखनौ, पाटणा इत्यादी शहरे तिबेटच्या कोणत्याही भागातून बॉम्बफेकी विमानाच्या साहाय्याने चीन उध्वस्त करू शकेल.

### अण्वस्त्र-क्षेत्रात चीनचे स्थान

चीनने थोड्या अवधीत अण्वस्त्रांबाबत डोळ्यात भरण्यासारखी प्रगती केली आहे, ती खरोखर प्रशंसनीय आहे. इतकी उत्तम प्रगती अण्वस्त्रात करून चीनला चार वडचांच्या मालिकेत बसविण्यात ज्या शास्त्रज्ञांचे प्रयत्न कारणीभूत झाले त्यातील पहिले म्हणजे पेकिंग येथील इन्स्टिटयूट ऑफ न्युक्लिअर एनर्जी या संस्थेचे प्रमुख संचालक चेन-सॉन-चिआंग हे होत. ते अणुशास्त्रात निष्णात असून त्यांचे बहुतेक शिक्षण पॅरिस येथे झाले आहे. चीनचे अण्वस्त्राचे धोरण बहुतेक त्यांच्याच सल्ल्यानुसार आखले जात आहे. दुसरे वॉग-कान-चंग व तिसरे चास-चुंग-याव यांचेही शिक्षण पाश्चिमात्य देशांत झाले असून कॅलिफोर्निया विद्यापीठातील इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजीमध्ये त्यांनी संशोधन केले आहे. चौथे चेन-हुसे-शेन हे क्षेपणास्त्राच्या कार्यक्रमाचे प्रमुख संचालक असून, त्यांनी कॅलिफोर्निया विद्यापीठातील इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी या संस्थेत जेट विमानाचे तज्ज्ञ थिओडोर व्होन कारमन यांच्या देखरेखीखाली जेट विमानाचा खास अभ्यास केला आहे. तसेच मॅसाच्यूसेट येथील इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी या संस्थेत जेट विमानाचे खास संशोधन करून त्यांनी डॉक्टोरेट मिळविली आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटी अमेरिकेच्या हवाई दलातर्फे जर्मनीने तयार केलेल्या व्ही-१ व व्ही-२ या रॉकेटच्या खास संशोधनाकरिता जे तज्ज्ञ युरोपमध्ये गेले होते त्यात चेन-हुसे-शेन यांचा समावेश होता, हे विशेष होय. अशा तऱ्हेने त्यांनी अद्यावत अशा रॉकेटचा अभ्यास करून आता ते चीनला क्षेपणास्त्रांच्या क्षेत्रात बडयांच्या मालिकेत बसविण्याच्या कार्यात मग्न झाले आहेत.

ज्यांच्या अलौकिक बुद्धीने भारताला अणुक्षेत्रात जगात मानाचे स्थान मिळवून दिले त्या डॉ. भाभा यांची भारतीय जनता सदैव ऋणी राहील. त्याचप्रमाणे आपले दिवंगत पंतप्रधान पं. नेहरू यानी नव्या युगाची चाहूल लवकर ओळखून १९५६ साली कॅनडाच्या साहाय्याने ट्रॉम्बे येथे अणुरिॲक्टर बांधून अणुक्षेत्रात पदार्पण केले त्याबद्दल त्यांचीही भारतीय जनता ऋणी आहे. थोडयाच वर्षात डॉ. भाभा यांच्या मार्गदर्शनाखाली भारतीय शास्त्रज्ञांनी अणुक्षेत्रात केलेली प्रगती खरोखरच अभिनंदनीय आहे. चीनने १९६४-मध्ये अण्वस्त्राचा पहिला स्फोट केल्यानंतर आणखी एका संकटाची भर पडून नव्या संरक्षण समस्येची भारताला जाणीव झाली. परंतु भारतसुद्धा अणुबॉम्ब करण्याच्या तयारीत आहे हे १९६५ मध्ये प्लुटोनियम प्लॅन्ट आपल्याच शास्त्रज्ञानी तयार करून आपली अणुक्षेत्रातील प्रगती जगास दाखविलेली आहे.

अणुबॉम्ब तयार करावयाचा म्हणजे मोठ्या खर्चाचा भाग आलाच. अण्वस्त्र बनविण्याचा खर्च आपल्या देशाच्या सध्याच्या आर्थिक परिस्थितीला परवडणारा नाही अशा तऱ्हेच्या शंकाही काही लोक प्रदर्शित करू लागले. तेव्हा देशातील सर्वसामान्य जनतेतील अणुबॉम्बसंबंधीचे औत्सुक्य लक्षात घेऊन डॉ. भाभा यानी २४ ऑक्टोबर १९६४ रोजी ऑल इंडिया रेडिओवरून भाषण करून अणुबॉम्बसंबंधीचा खर्चाचा अंदाज सांगितला. त्यात त्यानी म्हटले की १० किलो टनचा (१० हजार टन टी.एन.टी.) अणुबॉम्ब तयार करण्यास ३ लक्ष ५० हजार डॉलर किंवा १७ लक्ष ५० हजार रुपये खर्च येईल. तर २ मेगॅटन शक्तीचा हायड्रोजन बॉम्ब करण्यास (२० लक्ष टन टी.एन.टी.) ६ लक्ष डॉलर किंवा ३० लक्ष रुपये खर्च येईल. म्हणजेच नेहमीच्या साध्या बॉम्बपासून २० लक्ष टन टी.एन. टी. उष्णता शक्ती निर्माण करावयाची म्हटल्यास एका बॉम्बपासून इतकी शक्ती निर्माण होणे शक्य नाही. शिवाय २० लक्ष टन टी. एन. टी. उष्णताशक्ती निर्माण करावयास १५० कोटी रुपये खर्च येईल. म्हणजेच अणुबॉम्ब हा साध्या बॉम्बपेक्षा २० पटीने स्वस्त तर हायड्रोजन बॉम्ब हा ५०० पटीने स्वस्त पडेल. अशा तऱ्हेने अणुबॉम्ब तयार करावयाचा म्हटल्यास तो आवाक्याबाहेर

अनुक्रमणिका






नाही व आपणही अणुबॉम्ब तयार करू शकतो, हे सप्रमाण दाखवून दिले. परंतु त्याकरिता आपल्या संरक्षण खर्चात योग्य अशी वाढ करणे अगत्याचे आहे.

आता आपण अण्वस्त्र दलाविषयीच्या खर्चाचा विचार करू. अण्वस्त्र दल उभारण्याचा निर्णय घेतल्यास पहिल्या दहा वर्षात भारतास ५००० कोटी रुपये खर्च करावे लागतील. म्हणजेच प्रत्येक वर्षी जो संरक्षण खर्च आखला जाईल त्यामध्ये ५०० कोटी रुपये अण्वस्त्राकरिता बाजूला काढावे लागतील, असा आपल्या तज्ज्ञांचा अंदाज आहे. या खर्चात अणुबॉम्ब, अण्वस्त्रवाहिका म्हणजे बॉम्बफेकी विमाने, रॉकेट किंवा मध्यम पल्ल्याची क्षेपणास्त्रे व इतर यंत्रणा यांचा अंतर्भाव होईल. आपणाजवळ असलेल्या साधनसामुग्रीच्या आधारे आपण किती अणुबॉम्ब तयार करू शकतो याचा अंदाज घ्यावयाचा म्हटल्यास तज्ज्ञांच्या मते असे म्हणता येईल की ट्रॉम्बे येथील रिॲक्टरमधील अणुइंधनापासून २० किलोटनचे दोन अणुबॉम्ब वर्षाला तयार होऊ शकतील. तारापूर येथील रिॲक्टर तयार झाल्यानंतर त्यातील अणुइंधनापासून १० अणुबॉम्ब वर्षाला तयार होऊ शकतील, तर राणा प्रताप सागर येथील रिॲक्टर अणुइंधनापासून वर्षाला ३० अणुबॉम्ब तयार होऊ शकतील. परंतु ही अणुकेंद्रे कॅनडा व अमेरिकेच्या सहकार्याने बांधल्यामुळे त्यांच्याशी केलेल्या कराराप्रमाणे–या रिॲक्टरमधील अणुइंधनाचा उपयोग फक्त शांततेकरिताच केला जाईल असे भारताने लिखित अभिवचन दिल्यामुळे आपण या करारास बांधून गेलो आहोत.तेव्हा यातून मार्ग म्हणजे लवकरात लवकर आपण स्वतःचे अणुकेंद्र बांधणे हा होय. सरकारी धोरणानुसार काही दिवसात मद्रासजवळ कलपक्कम् येथे आपल्याच शास्त्रज्ञांनी तयार केलेले संपूर्ण भारतीय बनावटीचे चौथे अणुकेंद्र होणार आहे, हे त्या दृष्टीने सुचिन्ह आहे असे म्हटले पाहिजे.

युनोने नेमलेल्या आंतरराष्ट्रीय अणुशास्त्रज्ञानी जो अहवाल युनोच्या सरचिटणीसाना सादर केला ( टॉईम्स ऑफ इंडिया २४–१०–६७) त्यात त्यानी म्हटले आहे की अण्वस्त्रधारी पाच राष्ट्रे सोडून ज्या सहा राष्ट्रांची अण्वस्त्र तयार करण्याची तयारी आहे अशा सहा राष्ट्रांना (भारत, स्वीडन, पश्चिम जर्मनी, कॅनडा, इटली व जपान ) मध्यम प्रतीचे अण्वस्त्र दल उभारण्याकरिता दरवर्षी १७० मिलीयन डॉलर किंवा २२७ कोटी ५० लक्ष रुपये जादा खर्च करावे लागतील. या मध्यमप्रतीच्या अण्वस्त्र दलात ३०/५० जेट बॉम्बफेकी विमाने, ५० मध्यम पल्ल्याची क्षेपणास्त्रे की जी क्षेपणास्त्रे ३००० किलो मिटरमधील लक्ष्यांवर सहज मारा करू शकतील व १०० प्लुटोनियम बॉम्बचा या दलात समावेश असणे आवश्यक आहे. अर्थात हा खर्च सतत दहा वर्षे करणे जरूर आहे. तसेच या सहा राष्ट्राना लहान परंतु अत्यंत प्रभावी असे अण्वस्त्र दल तयार करावयाचे असल्यास ५६० मिलीयन डॉलर किंवा ४२० कोटी रुपये प्रत्येक वर्षी जादा खर्च याप्रमाणे पहिली पाच वर्षे करावा लागेल. नंतरच्या पाच वर्षात तितकाच किंवा त्यापेक्षा जास्त खर्च करावा लागेल. या लहान परंतु प्रभावी अण्वस्त्र दलात १०/१५ जेट











बॉम्बफेकी विमाने, १५/२० अण्वस्त्रे पहिल्या पाच वर्षात तयार होऊ शकतील. दुसऱ्या टप्प्यात म्हणजे नंतरच्या पाच वर्षात त्यात आणखी वाढ म्हणून २०/३० हायड्रोजन बॉम्ब, १०० मध्यम पल्ल्याची क्षेपणास्त्रे ( I R B M ) व दोन क्षेपणास्त्रांनी सुसज्ज अशा पोलरीस पद्धतीच्या पाणबुड्या इत्यादींचा समावेश या प्रभावी अण्वस्त्र दलात असणे जरूरीचे आहे. आपल्या शास्त्रज्ञांनी काढलेल्या अनुमानाप्रमाणे प्रत्येक वर्षीच्या ५०० कोटी रुपयांचा खर्चाचा पडताळा या हिशोबाशी सहज मिळून येतो हे येथे नमूद करावेसे वाटते.

भारताने अण्वस्त्र तयार करावयाचे म्हटल्यास आपल्या शास्त्रज्ञांच्या मते काही तांत्रिक अडचणी आहेत. पहिली अडचण म्हणजे आपल्या देशाचे औद्योगीकरण भक्कम पायावर होणे आवश्यक आहे. त्यामुळे अण्वस्त्र निर्मितीला अत्यावश्यक मालाचा सतत पुरवठा करता येईल व आपली आर्थिक परिस्थिती अधिक मजबूत होऊन संरक्षणाकरिता पैशाची अडचण भासणार नाही. दुसरी अडचण म्हणजे अण्वस्त्र नेण्याची यंत्रणा – अण्वस्त्र-वाहिका ( Delivery System ) होय. आपणाकडे क्षेपणास्त्रे नाहीत, तेव्हा लांब पल्ल्याच्या बॉम्बरची अणुबॉम्ब नेण्याकरिता अत्यंत आवश्यकता आहे. अशा बॉम्बफेकी विमानांचा विचार केल्यास आपल्या वायुदलात असलेले 'कॅनबेरा' या बॉम्बरचा उल्लेख करता येईल. जरी हे विमान अणुबॉम्ब नेण्याकरिता बांधलेले नसले तरीसुद्धा त्यामध्ये योग्य अशा दुरुस्त्या केल्यास ते उपयोगी पडू शकेल. चीनसुद्धा त्यांच्याजवळ असलेले जुन्या पद्धतीचे टीयु–४ ( Tu-4 ) ह्या बॉम्बफेकी विमानात अशा दुरुस्त्या करीत आहे. नाहीपेक्षा आपल्याच कारखान्यात बांधलेले एच. एफ–२४ ( HF 24 IA ) –'मरुत' स्वनातीत फायटर – बॉम्बरचा उपयोग होऊ शकेल. हे जरी अजून सुधारणा अवस्थेत असले तरी ही उणीव बऱ्याच प्रमाणात भरून काढू शकेल. तिसरी महत्त्वाची अडचण म्हणजे अणुबॉम्ब तयार केल्यानंतर त्याची शक्ती किती आहे हे चाचणी प्रयोग करून पाहणे. त्याकरिता योग्य अशी जागा पाहिजे. त्या जागेपासून जीवितमात्राला कोणत्याही तऱ्हेचा धोका पोचणार नाही अशी ती असली पाहिजे व चौथी अडचण म्हणजे शेजारी राष्ट्रांची होणारी प्रतिकूल मतप्रदर्शने होत. तेव्हा या सर्व अडचणींना दूर सारून अण्वस्त्र दल निर्माण करावयाचे म्हटल्यास ते फार कठीण आहे असे आपणास वाटत नाही. या सर्व अडचणी दूर होऊ शकतील परंतु त्या दिशेने जोराचे प्रयत्न व आपल्या पुढाऱ्यांची मानसिक तयारी होणे जरूर आहे.

जगात संघर्ष नित्याचेच चालू आहेत. जर अण्वस्त्रधारी राष्ट्रांची संख्या अशीच वाढत गेली तर पुढेमागे मानवी जीवन व संस्कृती धोक्यात आल्यावाचून राहणार नाही. म्हणून अण्वस्त्रांचा जगात जास्त प्रसार होऊ नये व पांच अण्वस्त्रधारी राष्ट्रांजवळ फक्त अण्वस्त्राचा साठा असावा असे दोन बड्यांनी विचार केलेला दिसतो. म्हणून जिनेव्हा येथे निःशस्त्रीकरण परिषदेत अमेरिका, रशिया व इंग्लंड यांच्या एकमताने मंजूर केलेला 'अण्वस्त्र प्रसार बंदी करार' ( Non-Proliferation Treaty ) युनोच्या सभेत सर्व राष्ट्रांच्या संमतीकरिता येणार आहे. या करारावर सर्व राष्ट्रांनी व विशेषतः ज्या राष्ट्रांची अण्वस्त्र दल निर्माण करण्याची तयारी आहे, अशा राष्ट्रांनी प्रथम सह्या करून या करारास संमति द्यावी,असा बड्यांचा आग्रह आहे. या कराराचा आपल्या हितसंबंधाच्या व सुरक्षिततेच्या दृष्टीने विचार करावयाचा म्हटल्यास प्रथम आपणास चीनच्या अण्वस्त्र हल्ल्यापासून बड्या राष्ट्रांकडून संरक्षणाची संयुक्तपणे लेखी हमी या कराराद्वारे मिळणे अत्यंत आवश्यक आहे. व अशा तऱ्हेची आपली भूमिका वेळोवेळी निःशस्त्रीकरण परिषदेत मांडलेली आहे. दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे अण्वस्त्रधारी राष्ट्रांनी सध्या त्यांच्याजवळ असलेल्या अण्वस्त्राचा साठा गोठवून, त्यात आणखी भर घालण्याचे धोरण सोडून द्यावे, म्हणजे अण्वस्त्राचे हळूहळू निःशस्त्रीकरण करता येईल. परंतु बड्यांचे भूमिगत अण्वस्त्राचे चांचणी प्रयोग चालूच असून त्यांच्या शस्त्रसंभारात आणखी भर घालण्याचे त्यांचे धोरण कायम आहे, त्यामुळे खऱ्या अर्थाने निःशस्त्रीकरण होणार नाही. शिवाय फरान्स व चीन ही दोन अण्वस्त्रधारी राष्ट्रे या करारावर सही करण्यास तयार नाहीत, इतकेच नव्हे तर या दोन राष्ट्रांनी जिनेव्हा येथील निःशस्त्रीकरण परिषदेत भागसुद्धा घेतला नाही, त्यामुळे या करारास काहीच अर्थ उरत नाही. जर दोन बड्यांनी लेखी हमी या कराराद्वारे दिली नाही तर पुढेमागे चीन अण्वस्त्राची दहशत भारतास दाखवून आपले राजकीय उद्दिष्ट साध्य करण्याची बरीच शक्यता आहे. तेव्हा या सर्व गोष्टींचा आपल्या देशाच्या सुरक्षिततेच्या दृष्टिने विचार करता असे म्हणता येईल की जोपर्यंत बडी राष्ट्रे अण्वस्त्राच्या हल्ल्यापासून आपणास संरक्षणाची संयुक्तपणे लेखी हमी या कराराद्वारे देत नाहीत, तोपर्यंत अण्वस्त्र प्रसार बंदी करारावर सही करणे म्हणजे भारतासारख्या राष्ट्राने आत्मघात करण्यासारखे आहे. आणखी विशेष गोष्ट म्हणजे अण्वस्त्रधारी राष्ट्रांचे उद्दिष्टही वेगळे आहे, असे त्यांच्या आतापर्यंतच्या धोरणावरून वाटते. या बड्या राष्ट्रांना

(पृष्ठ ४८ वर पहा)

**विमानोड्डाणातील अविस्मरणीय प्रसंग**
**'दीपावली' च्या मे १९६९ च्या 'वायुसेना दल विशेषांका'साठी वरील विषयावर आपले अनुभव पाठवा.**
**शब्दसंख्या १५०० ते २०००**
**अखेरची मुदतः २० मार्च १९६९**



अनुक्रमणिका

निंबाच्या झाडाखाली याकूबचे भूत पाहताच व्हिन्सेंट साहेबाची बोबडीच वळली. ते भूत आपल्याकडेच येत असल्याचे पाहून साहेबाने एक एक पाऊल मागे घेण्यास सुरुवात केली आणि

# भुताने सूड उगवला

## त्याची गोष्ट



पंचवीसएक वर्षांपूर्वीची गोष्ट. सुरस तशीच चमत्कारिक. दुसरे महायुद्ध चालू होते. अर्थात त्यावेळी हिंदुस्तानात ब्रिटिश राजवट होती. मुंबईच्या गोदीत, बोटींच्या ने-आणीच्या कामगिरीवरील बहुसंख्य पायलट्स व बर्थिंगमास्टर्स ब्रिटिशच—म्हणजे गोरे साहेब होते. डॉकमास्तर व असिस्टंट डॉकमास्तर तर हमखास गोराच असे. हे गोरे साहेब बहुतेक सारे अर्धशिक्षित असायचे हे खरे असले, तरी राज्यकर्त्यांचे जातभाई म्हणून आपल्याच घमेंडीत—गुर्मीत असत. तर —— एका खुनशी असिस्टंट डॉकमास्तरवर त्याच्याच हाताखालच्या खलाशांनी कसा गमतीदार सूड उगवला ते सांगणारी ही कथा.

अपोलो बंदराच्या पलीकडे समुद्रात येऊन उभ्या राहिलेल्या परदेशी बोटींना गोदीत काही दिवस वस्तीला आणून ठेवायचे, आणि मुक्काम संपल्यावर त्यांची पुन्हा बाहेर रीतसर पाठवणी करायची या कामगिरीवर ही साहेबमंडळी असायची. पोर्ट ट्रस्टचा पायलट समुद्रातील बोटीवर ठरलेल्या वेळेनुसार जायचा व आपल्या मार्गदर्शनाखाली ती बोट गोदीच्या खंदकवजा चॅनेलच्या तोंडाशी आणून सोडायचा. मग तिथे तो खाली उतरायचा आणि बोटीचा ताबा असिस्टंट डॉकमास्तर मास्तर चढायचा; कारण बोट अमुक एका बर्थवर—ठाण्यावर नेऊन पोचती करायची मुखत्यारी त्याची. तर असिस्टंट डॉकमास्तर चॅनेलच्या एका तटावर उभा राहायचा आणि हातात पत्र्याचे मोठे फनेल घेऊन ते तोंडाला लावून जोरजोराने सूचना पुकारीत असायचा. बोटीवरील अधिकारी, बोटीला दोरखंड बांधून खेचीत असलेल्या टग्स व बोटीला बांधलेल्या तारांच्या रश्शी खेचीत असलेले चॅनेलच्या दोन्ही तटांवरील खलाशी या सर्वांना त्या सूचनांनी मार्गदर्शन केले जायचे; बोट चॅनेलच्या तटांना न आदळता सुरळीत जावी म्हणून. गोदीतला मुक्काम आटोपून बोट बाहेर जायची तेव्हा याच्या उलट क्रम चालायचा. म्हणजे बर्थिंगमास्तर बर्थमध्ये बोटीवर प्रथम चढून तिला चॅनेलमधून गोदीच्या तोंडाशी नेऊन सोडायचा व पायलटच्या स्वाधीन करायचा. असिस्टंट डॉकमास्तरचे काम मात्र बहुधा बदलायचे नाही.

अमुक एक बोट गोदीत कधी येणार किंवा बाहेर जाणार याची कल्पना सर्व संबंधितांना आगाऊ दिलेली असे. भरतीच्या वेळेनुसार कमीअधिक वजनाच्या बोटींची गोदीत ने—आण चालायची. डॉकमास्तरच्या कचेरीतील सूचनापुस्तकात, एरवी नावनिशीसह पण युद्धकाळात विशिष्ट टोपण नंबरासह वेळेची नोंद डॉकमास्तर करून ठेवीत असे. ठरलेल्या वेळेच्या जरा अगोदरच वरीलप्रमाणे सर्व संबंधित मंडळी आपापल्या कामगिरीवर रुजू होई.

डॉकमास्तरच्या कचेरीत आळीपाळीने पण चोवीस तास 'पोरीवाला' म्हणून, जरा इंग्रजी शिकलासवरलेला जाणता खलाशी असे. ड्यूटीवरच्या पोरीवाल्याने, डॉकमास्तरच्या कचेरीच्या इमारतीत वरच्या मजल्यावर राहणाऱ्या असिस्टंट डॉकमास्तरला त्याच्या ड्यूटीच्या वेळी आगाऊ जाऊन उठवायचे असा प्रघात पडला होता. वास्तविक हे काम पोरीवाल्याच्या ड्यूटीतले नसायचे. साहेबाची मर्जी संपादण्याच्या दृष्टीने पोरीवाल्यांनी ही जादा कामगिरी पत्करलेली असे. पण या सोयीला सरावलेले साहेब मात्र ती गोष्ट हक्काची मानीत.

ही कथा घडली, तेव्हा असिस्टंट डॉकमास्तर असलेला व्हिन्सेंटसाहेब नेहमी गुर्मीत असे. एके रात्री ही स्वारी खूप दारू ठोसून मध्यरात्रीनंतर झोपी गेली होती. पहाटे बोट यायची वेळ झाली, तेव्हा पोरी-

पंढरीनाथ रेगे







अनुक्रमणिका

घंटा वाजवून त्याला वेळेवर उठवण्याचा आपल्यापरी प्रयत्न केला होता. पण दारूच्या नशेत उशीरा झोपलेल्या व्हिन्सेंटसाहेबाला जाग कुठली येते? बोट गोदीच्या तोंडाशी येऊन ठेपली तरी साहेबमहाशयांचा पत्ता नाही, हे पाहून याकूबने पुन्हा धावत-पळत जाऊन त्याच्या दारावरची घंटी जोरजोराने वाजवली. तेव्हा मात्र स्वारी करवादत झाली तरी खडबडून उठली. दार उघडताच याकूबने त्याला बोट येऊन ठेपल्याचे सांगितले. त्याबरोबर साहेब खवळला. 'जल्दी क्यों नहीं उठाया?' म्हणून त्याच्यावरच गुरकावला.

मग घाईघाईने सफेत गणवेश चढवीत साहेबाने फनेल हातात घेतले आणि तो चिडून याकूबच्या अंगावर पिसाळलेल्या कुत्र्यासारखा धावून गेला.

"साब, मैं एक दफे घंटी बजाके गया... तोभि आप...–" याकूब आपली बाजू दारातूनच मिनतवारीने मांडू लागला.

पण त्याचे म्हणणे नीट ऐकूनसुद्धा न घेता, संतापलेल्या साहेबाने हातातले फनेल त्याच्या डोक्यात सडकून हाणले. त्याबरोबर याकूब जिन्यात कोलमडून पडला आणि पायऱ्यांवरून गडगडत, ठेचकाळत थेट खाली गेला. एवढे झाले तरी साहेबाने त्याची काहीच दखल घेतली नाही. दार बंद करून तो आपल्याच गुर्मीत, खाड्खाड् बूट आपटीत धडाधड पायऱ्या उतरला, आणि जिन्याच्या पायथ्याशी विव्हळत पडलेल्या याकूबच्या पेकाटात जाता जाता तुच्छतेने लाथ मारून धावतपळत आपल्या कामगिरीवर जाऊन थडकला.

त्यावेळी जवळपास कोणीच मदतीला नव्हते. त्यामुळे, वर्मी घाव बसलेला घायाळ याकूब विचारा थोडयाच वेळात प्राणास मुकला.

बोट गोदीत घेतल्यावर, आपली कामगिरी आटोपून व्हिन्सेंटसाहेबाची स्वारी आपल्या मकानाशी परतली. तर याकूब होता तिथेच मढयासारखा गप्प पडून राहिलेला. त्याचे काही बरेवाईट तर झाले नाही?–या भीतीदायक शंकेने दचकून साहेबाने वाकून न्याहाळले. हालवून पाहिले. आता चांगलेच उजाडले होते. याकूब ठार मेल्याचे लक्षात यायला त्याला उशीर लागला नाही. आपल्या हातून चक्क खून झाला ही गोष्ट कळून चुकताच त्याची गुर्मी तर पार उतरलीच; पण तिची जागा भीतीने घेतली. आता?

एकंदर प्रकरण आपल्या अंगाबाहेर कसे झटकायचे या दृष्टीने त्याचे विचारचक्र सुरु झाले. प्रसंगावधानाने त्याने आरडाओरडा करीत खलाशांच्या नावाने हाकाटी चालवली. खलाशी एकामागून एक धावतपळत आले.

आपण कामगिरीवर गेलो असताना पाठीमागून दार लावून परतत असताना पायरी चुकून याकूब गडगडत खाली आला व डोके फुटल्याने अपघाती मरण पावला, असा निष्कर्ष व्हिन्सेंटसाहेबाने, दमदाटीच्या अवसानाने त्यांच्यापुढे व्यक्त केला. त्याच्या प्रेताची रीतसर विल्हेवाट लावायलाही त्याने फर्मावले. पण ही निर्घृण हत्या त्या खुनशी साहेबाच्याच हातून घडली असावी याबद्दल कुणालाच शंका नव्हती. साहेबमहाशयांचा कावराबावरा झालेला तांबूस गोरा चेहराच त्याची साक्ष देत होता. पण तसे बोलून दाखवण्याचे धाडस मात्र कुणालाच झाले नाही. त्याच्याकडे संशयी नजरेने पहात ते आपापसात कुजबुजू लागले एवढेच. तेवढयात एकजण मागल्यामागे सटकला, आणि त्याने पळत जाऊन गोदीतल्या एका पोलिसाला बोलावून आणले.

पोलिसांपर्यंत प्रकरण गेल्याचे पाहून साहेबाची स्वारी मनातून नरमली. तरीपण, काही झाले तरी आपण राज्यकर्त्या जमातीचे प्रतिनिधी आहोत ही जाणीव उफाळून वर आली. त्याबरोबर सावरून घेत त्याने, अपघातानेच याकूब कसा मेला हे आपले पहिलेच अनुमान पोलिसाला वेधडक ठणकावून सांगितले.

पोलीस स्टेशनवर कुणीतरी फोन केल्यावरून पोलीस अधिकारीही तेवढयात आला. व्हिन्सेंटसाहेबाच्या सुदैवाने तो गोराच होता. मग काय?–त्याला व्हिन्सेंटने आपल्या दिवाणखान्यात नेले आणि काही वेळ त्याच्याशी गुफ्तगू केले.

झाले! अखेर, गोऱ्या कातडीने गोऱ्या कातडीचा बेमालूम बचाव केला. याकूबला अपघाताने मृत्यू आला असे बेशक ठरविण्यात आले. व्हिन्सेंटसाहेबाची सहीसलामत सुटका झाली.

पण खलाशीमंडळी मनातून अर्थातच चिडली होती. या खुनी साहेबाला याकूबच्या खुनाबद्दल कधी-ना-कधी चांगला धडा शिकवायचा असे त्यांच्या म्होरक्यांनी मनोमन ठरविले.

पण, काही झाले तरी ब्रिटिश राजवटीतल्य गोऱ्यासाहेबाशी गाठ होती. डाव रचून तो विनबोभाट पार पाडणे सोपे नव्हते. अखेर अक्कलहुशारीने सारंग अब्दुलमिया व बावटेवाला जयराम यांनी योजना तर आखली. संधीची ते वाट पाहू लागले, त्यादृष्टीने त्यांनी जाळे पसरायलाही सुरुवात केली. याकूबचे भूत



## कविता आणि कवी मित्रांसाठी

'दीपावली'कडे अनाहूतपणे कविता पाठविणाऱ्या कवींचे काव्य प्रसिद्ध झालेला फक्त अंकच यापुढे सदिच्छेचे प्रतीक म्हणून पाठविण्यात येईल. त्याबाबत कोणताही वेगळा पत्रव्यवहार करता येणार नाही याबद्दल क्षमस्व.

**— संपादक**



अनुक्रमणिका

व्हिन्सेंटच्या वागेत रात्री मधूनमधून दिसते अशी अफवा पसरविण्यात आली. व्हिन्सेंट-साहेवाच्या कानावरही ही गोष्ट जयरामने एकदा हळूच घातली. वागेतल्या निंवाच्या मोठ्या झाडावर ते भूत मुक्काम ठोकून असावे असा तर्कही त्याने वोलून दाखविला. अमवास्येच्या रात्री भुताला विशेप जोर असतो. म्हणून त्या रात्री जरा जपून वागेत जा, असा साळसूद सल्ला द्यायलाही तो विसरला नाही.

याकूवचा जुळा भाऊ इसूफ भेंडीवाजारात रहात असे. सारंगाने त्याला विश्वासात घेतले आणि एखाद्या अमावास्येच्या रात्री व्हिन्सेंटसाहेवावर सूड उगवण्याचा डाव गुपचूप रचला.

आणि नाताळातल्या एका अमावास्येच्या रात्री व्हिन्सेंटसाहेव अपोलो वंदरावरील युरोपीयनांच्या क्लवात मद्यपानाच्या पार्टीला जाणार असल्याची कुणकुण सारंगाला लागली. त्याने जयरामाशी संगनमत केले, आणि त्या दिवशी संध्याकाळीच इसूफला गोदीत आणवला. गोदीच्या प्रवेशद्वाराशी, जाता–येताना प्रत्येक खलाशाला आपला पितळी नंवरवाला विल्ला दाखवावा लागे. म्हणून एका खलाशामार्फत दुसऱ्या एकाचा विल्ला पाठवून इसूफच्या प्रवेशाची सोय करण्यात आली.

रात्री जेवणखाण उरकल्यावर इसूफला सारंगाने गुपचूप खलाशाचे गडद निळे कपडे दिले. ते पेहरून मध्यरात्रीच्या सुमारास, ठरल्याप्रमाणे तो व्हिन्सेंटसाहेवाच्या वागेवाहेर, निंवाच्या झाडाशी जाऊन उभा राहिला.

अमावास्येची रात्र असल्याने काळोख काजळासारखा दाटला होता. युद्धकाळ असल्याने गोदीतील खांवांवरचे विजेचे दिवे लावलेले नसत. मध्यरात्रीची वेळ. त्यामुळे सगळीकडे शांतता पसरली होती. रातकिड्यांची किर्रकिर्र व समुद्राच्या लाटांचा खळखळाट एवढेच काय ते ऐकू येत होते आणि मधूनच समुद्रावरून वाऱ्याचा झोत येई व झाडाची पाने सळसळत.

एक वाजण्याचा सुमार झाला, तसा दारूच्या नशेत, टॉर्चच्या प्रकाशात मंदमंद पावले टाकीत व्हिन्सेंटसाहेव डुलतडुलत चॅनेलपाशी आला. चॅनेलच्या तोंडाशी, अलीकडे पलीकडे जायला अरुंद चिचोळा 'कायसून' पूल होता. त्याच्या पलीकडे वाहेर समुद्र. वोट आत यायची किंवा वाहेर जायची असली की कळ फिरवली जायची आणि हा पूल मध्ये दुभंगून दोन्ही भागांनी चॅनेलच्या दोन्ही फरसवंदी तटांना चिकटून राहायचा. या वेळी अर्थातच तो अखंड होता. पावलांपुढे टॉर्चचा उजेड टाकीत व्हिन्सेंटसाहेव आस्तेआस्ते पूल पार करून अलीकडे येऊ लागला. पूल कसावसा ओलांडला. तोच समोरच्या त्याच्या वागेतल्या निंवाच्या पानांची विचित्र सळसळ त्याच्या कानांवर पडली. लगेच 'घूंऽऽ घूंऽऽ' असा घुवडासारखा आवाजही हवेत घुमला.

साहेवाने दचकून टॉर्चचा प्रकाशझोत झाडावर टाकला; तर, त्या झाडाशी कुणीतरी खलाशी उभा. मध्यरात्रीच्या वेळी सगळीकडे सामसूम असताना खलाशाचे इथे काय काम? आणि, ती अमावास्येची रात्र असल्याचे अचानक त्याच्या ध्यानी आले. त्या झाडावर भूत वस्ती करून असल्याची वदंताही आठवली. त्याच्या मनावर भीतीचा एकदम पगडा वसला. तरीपण धीर एकवटून त्याने टॉर्चचा झोत त्या खलाशाच्या थेट तोंडावर टाकला. तर चेहरा याकूवचा. याकूव?—म्हणजे. याकूवचे भूतच!

व्हिन्सेंटसाहेवाच्या पोटात भीतीचा गोळा उठला, अंगाला कापरे भरले, टॉर्चचा थरथरता हात गलित होऊन लोंवकळू लागला. पावले जागच्या जागीच खिळून राहिली. त्याचे विस्फारलेले भयग्रस्त डोळे मात्र याकूवच्या भुताच्या चेहऱ्याचा एकटक वेध घेत होते. आता पुढे कोणता प्रसंग आपल्यावर ओढवतो या कल्पनेने साहेवमजकूर गांगरून गेले. साहेवाची घावरगुंडी उडालेली पाहून त्या भुताला हसू फुटले. पण प्रसंगावधानाने त्याने जवडा विचकून त्या हास्याचे रूपांतर लगेच विकट हास्यात केले.

काही क्षणातच, ते भूत मंद मंद पावले टाकीत आपल्याच दिशेने पुढे पुढे सरकत असल्याचे व्हिन्सेंटला दिसले. भूत विकट हास्य करीत असल्याचे दिसत होते; पण हसण्याचा आवाज मात्र ऐकू येत नव्हता. साहेवमहाशयांना दरदरून घाम सुटला. मोठ्याने ओरडावेसे वाटले; पण वोवडी वळल्याने तोंडातून शब्दही फुटेना. भुतावर नजर रोखून तो कायसून पुलाच्या वाहेरच्या–उजव्या अंगाला, समुद्राच्या वाजूला, एकेक पाऊल दवकत मागे

टाकीत पाठीमागे सरकू लागला. भुताने आपली मंद चाल सोडली नव्हती. ते सावकाशपणे एकेक पाऊल पुढे सरकत होते; तर हे राजेश्री भीतीने लटपटत, चाचपडत एकेक पाऊल मागेमागे सरकत होते. दोघांमध्ये तीसएक पावलांचे अंतर असेल, मागेमागे सरकताना आपण कुठे जात आहोत याचे भान त्या भयग्रस्त अवस्थेत व्हिन्सेंटला नव्हते. भुतावर रोखलेली नजर मात्र त्याने ढळू दिली नव्हती.

अखेर, मागे सरकता सरकता व्हिन्सेंटसाहेब समुद्राच्या काठाशी पोचला; अगदी कडेशी आला. चाचपडत्या मागल्या पावलाला तटाची कडा लागली, तसा तो दचकून एकदम भानावर आला. एकाएकी अवसान घेऊन त्याने मुखडा फिरवला आणि आवेगासरशी समुद्रात धाडकन उडी घेतली.

आता मात्र त्या भुताने – म्हणजेच इसूफने एकदम काठापर्यंत धाव घेतली. खाली पाहिले –– तर, साहेब जिवाच्या आकांताने पोहत सुटलाय्.

तो अद्भुत प्रकार पाहून इसूफला हसे आवरता आवरेना. तरीपण ते शिकस्तीने आवरून तो मागे फिरला. आणि पावलांचा आवाज होऊ न देता, शक्य तेवढ्या वेगाने धावत, त्याने खलाशांच्या मकानाशेजारचे चिंचेचे मोठे झाड गाठले. सारंग व जयराम एकंदर प्रकार टेहळत तिथेच दबकून बसले होते.

धापा टाकीत, त्यातल्या त्यात येणारे हसू आवरीत इसूफने झाल्या प्रकारची गंमत, हलक्या आवाजात त्यांच्या कानावर घातली. ती ऐकून त्यांना तर हर्षाच्या उकळ्या फुटल्या. पण आता तिथे जास्त वेळ थांबणे हिताचे नाही हे लक्षात घेऊन ते तिघेही तिथून सावधपणे सटकले आणि गुपचूप जाऊन झोपले. अर्थात् रात्रीच्या त्या चित्तथरारक प्रसंगामुळे त्यांना धड झोप कुठून यायला! उरलेली रात्र त्यांनी कशीतरी डोळे मिटून काढली झाले !

पहाट झाली, तसे अंगावरचे खलाशाचे कपडे उतरून ठेवून इसूफने आपला नेहमीचा पोशाख केला आणि सारंगाचा निरोप घेऊन तो जो गोदीतून सटकला तो थेट भेंडीबाजारातल्या आपल्या मकानात.

सकाळी डॉकमास्तर आपल्या कचेरीत आला, तो व्हिन्सेंटसाहेबाचा, आपली बदली करण्याबद्दलचा विनंतीअर्ज घेऊनच. आपली प्रकृती बरी नसल्याने, बदलीचा हुकूम होईपर्यंत आपणाला रजा मंजूर करावी, अशी दुसरी विनंतीही सदर अर्जात व्हिन्सेंटने केली होती.

डॉकमास्तरकडून कचेरीतल्या हेडक्लार्कला व्हिन्सेंट साहेबाची हकीकत थोडक्यात कळली ती अशी––

रात्री क्लबातून घरी परतताना, बागेपाशी याकूबच्या भुताने पाठलाग केल्यामुळे, त्याच्या तावडीतून सुटण्यासाठी व्हिन्सेंटला निरुपायाने समुद्रात उडी घ्यावी लागली. पोहत पोहत त्याने अखेर कशीबशी बॅलार्डपियरच्या मोल बंदरापर्यंत मजल मारली. मग धक्क्यावरून धावत पळत तो गोदीबाहेर पडला, मिळाली ती टॅक्सी पकडली व थेट डॉक मास्तरचा कुलाब्याचा बंगला गाठला! आता तो या गोदीत परत यायला तयार नाही !

अर्थातच व्हिन्सेंटसाहेबाची बदली लौकरच दुसऱ्या गोदीत करण्यात आली. तेव्हापासून मग, नोकरीची उरलेली मुदत पुरी होऊन इंग्लंडला परत जाईपर्यंत व्हिन्सेंटसाहेबाची स्वारी त्या गोदीकडे, दिवसासुद्धा चुकूनही कधी फिरकली नाही.

• • •

**(व्यक्तींची नावे व तपशील काल्पनिक)**

अनुक्रमणिका









# संशय का मनी आऽऽला

श्रीधर धैसास

अरे पण हे कसं शक्य आहे ? डॉक्टरांनी टेवलावर मूठ आपटून रागानंच विचारलं.

वाबुरावांनी एकदा असहाय्यतेनं डॉक्टरांकडे पाहिलं, कोरडया पडलेल्या ओठांवरून पुन्हा एकदा आपली जीभ फिरविली, कपाळावर फुटलेला घाम हातरुमालानं पुसला आणि जड आवाजात ते म्हणाले,

मलाही प्रथम तुमच्यासारखाच धक्का वसला होता डॉक्टर ,... अशक्य–विलकूल अशक्य असं म्हणून मीही काणाडोळाच केला होता. पण आता माझीही खात्री झालीय !

डॉक्टरांनी वावुरावांकडे जरा अविश्वासानंच पाहिलं. वावुरावांची मान अलगद खाली गेली आणि ते वोटातील आंगठीशी चाळा करत राहिले. स्वतःशीच काहीतरी पुटपुटत डॉक्टरांच्या नजरेला नजर देण्याचं टाळू लागले.

" नो ऽ ऽ नो ...इंपॉसिवल " डॉक्टर मान हलवीत मोठ्यानं म्हणाले, "ही गोष्ट शक्य वाटत नाही मला. निदान माझ्या हातून तरी कुठल्याही प्रकारचा हलगर्जीपणा अजूनपर्यंत झाला नाही. आणि म्हणूनच असली गोष्ट होणं नाही इंपॉसिवल !" डॉक्टर प्रत्येक शव्दावर जोर देत म्हणाले.

"माझंही तेच म्हणणं आहे. तुमच्या ऐवजी दुसरा कोणी डॉक्टर असता तर संशयाला जागा होती. पण इथे प्रश्न तुमच्या रेप्युटेशनचा--तुमच्या कौशल्याचा होता. आणि म्हणूनच मी अधिक भांवावलोय !" वावुरावांनी स्पष्ट शव्दात कवुली दिली.

वराच वेळ डॉक्टर जमिनीकडे पाहात आपल्याच विचारात स्टेथास्कोपशी चाळा करीत राहिले.

" मिसेसला घेऊन ये उद्या, मी स्वतः तपासतो." डॉक्टरांनी निर्णय घेतला आणि वावुराव लटपटत्या पावलांनी एकदाचे वाहेर पडले.

डॉक्टर परत विचारात मग्न झाले. वावुरावांची शंका खरी ठरणं म्हणजे डॉक्टरांच्या रॅप्युटेशनलाच हादरा होता. त्यांच्या अफाट चाललेल्या प्रॅक्टीसला तर ही गोष्ट मुळीच परवडण्यासारखी





अनुक्रमणिका

नव्हती ! शेकडो ऑपरेशन्स त्यांनी आतापर्यंत केली होती. नव्हे असल्या ऑपरेशनमध्ये तर ते निष्णात मानले जात. आणि याच त्यांच्या कौशल्याला, प्रतिष्ठेला आणि त्यांच्याबद्दल वाटणाऱ्या विश्वासालाच तडा जाण्याची वेळ आली होती. डॉक्टर हादरून गेले होते.

जिल्ह्यातील नाणावलेले डॉक्टर म्हणून त्यांचा लौकिक होता. सकाळपासून तो अगदी रात्रीपर्यंत त्यांच्याकडे पेशंट्सची रीघ लागलेली असे. उमदे व्यक्तिमत्व, हसतमुख चेहेरा, मिठ्ठास वाणी व अचूक निदान यामुळे समाजातील सर्व थरांमध्ये ते सारखेच लोकप्रिय होते. एखाद्या गरीब पेशंटला त्याची परिस्थिती लक्षात घेऊन ते विनामूल्य औषधही देत आणि त्याची कसर खुशाल एखाद्या श्रीमंत पेशंटच्या बिलातून वसूल करीत. आणि तरीही त्यांच्याकडे वरच्या थरातील --म्हणजे 'हाय सोसायटीतील' पेशंट्सची विशेष गर्दी असे. कारण डॉक्टर फक्त शरीरशास्त्रातच तज्ज्ञ नव्हते, त्यांचा मानसशास्त्राचा अभ्यासही दांडगा होता. आणि वरच्या थरातील लोकात–विशेषतः उच्चवर्गीय स्त्रियांमध्ये हा मानसिक रोग म्हणजे --"नेहमीच काही ना काही होतंय " असं वाटत राहाण -- ही नेहमीची आढळून येणारी गोष्ट असल्यामुळे त्यांच्याकडे श्रीमंत स्त्री–पेशंट्सची कायम गर्दी असे.

यातील दोन-तीन स्त्री पेशंट्सशी डॉक्टरांच्या नावाचा संबंधही खालच्या आवाजात जोडला जाई ! पण पेशंट बरा करणं हेच ध्येय डॉक्टरांनी डोळ्यासमोर ठेवलं होतं. अखेर पेशंटच महत्त्वाचा त्याला बरं वाटलं पाहिजे, मग लोकांना काहीही वाटू दे ! मागे काही उद्योग नसतो म्हणून लोक काय वाटेल ते तर्ककुतर्क लढवतात. पण खरं पाहिलं तर, डॉक्टरांना दिवसाचे चोवीस तास सुद्धा अपुरे पडत असत ही वस्तुस्थिती होती.

आणि गेली दोन तीन वर्षे तर डॉक्टरांनी एक नवाच व्याप मागे लावून घेतला होता. सरकारने पुरस्कार केलेल्या "लाल त्रिकोणाचा !" या संततिनियमन प्रचार कार्याला डॉक्टरांनी सक्रीय पाठिंबा दिला होता. त्यातील शस्त्रक्रियेवर तर डॉक्टरांनी प्रभुत्वच मिळविलं होतं; कितीतरी प्रतिष्ठित लोक सरकारी दवाखान्यापेक्षा डॉक्टरांचा दवाखानाच अधिक पसंत करीत. यामुळे त्यांची प्रॅक्टीस कितीतरी पटीनं फुगली होती. डॉक्टरांना वेळ अपुरा पडत होता; आणि तरीही लोक उगाचंच काही तरी कधी तरी कुजबुजत होते.

आज तर त्यांच्या या प्रतिष्ठेलाच धक्का लागण्याची वेळ आली होती ! पण बाबुरावांनी सांगितलेल्या गोष्टीवर अजूनही डॉक्टरांचा विश्वास बसत नव्हता...

बाबुराव तर गोंधळलेल्या मनःस्थितीतच जेमतेम घरी येऊन पोचले आणि सुन्नपणे आपल्या " स्टडी "मध्ये येऊन आढ्याकडे एकटक पाहात राहिले. अगदी शून्यात नजर लावून बसल्यासारखे.

" काय झालं हो एकाएकी डॉक्टरांकडे जायला ? पुन्हा ब्लड प्रेशरचा त्रास सुरू झाला वाटतं ?" शरयूबाई जरा काळजीच्या स्वरातच बाबुरावांच्या ' स्टडी 'त प्रवेश करीत विचारत्या झाल्या.

> " पण याला पुरावा काय आहे ?" बाबुरावांनी स्वतःलाच प्रश्न केला. " सिद्ध करू शकतोस तू तसं ? तशी हिंमत आहे शरयूला विचारण्याची ? आणि तिनं तुझ्याच तोंडावर काही नावं फेकली तर ?"

आणि जवळ येऊन त्यांनी बाबुरावांच्या टक्कल पडू लागलेल्या डोक्यावरून हळूवारपणे हात फिरविला.

एरवी त्यांचा तो स्पर्श होताच बाबुरावांना ' मोरपिस फिरल्याचा भास होई. पण आज त्यांच्या अंगावर शहारून काटा उभा राहिला. आणि त्यांनी आपलं डोकं मोठ्या निग्रहानं बायकोच्या हातातून सोडवून ते पुन्हा अलिप्तपणानं बसले.

" हे काय आज नवीनच ?" कृतक्कोपानं बाबुरावांची हनुवटी वर करीत शरयूबाईंनी विचारलं आणि बाबुराव पुन्हा गडबडले.

गोळ्या घ्या आणि अगदी स्वस्थ पडून राहा पाहू आता ब्लड प्रेशर नाही ना चढलेलं ?

बाबुरावांनी नकारार्थी मान हलविली आणि शरयूबाईंनी एक सुटकेचा श्वास सोडला.

मग एवढे हताश झाल्यासारखे काय बनून राहिलात बाबुरावांनी न समजल्यासारखं त्यांच्याकडे पाहिलं. अगदी भकास नजरेनं.

पण आता मात्र शरयूबाई त्यांच्याकडे पाहात हळुहळू समजल्यासारख्या हसू लागल्या.

" म्हणजे त्या गोष्टीवरून तुम्ही एवढे काळजीत पडलात ? आणि मला सांगून अगदी घाइघाईने डॉक्टरांकडे जाऊन आलात ! कमाल आहे तुमची.. खरं म्हणजे काळजी मी करायची, डॉक्टरांकडे मी जायचं, तर माझ्या ऐवजी तुम्हीच जाऊन आलात... त्यात काय एवढं घाबरायला झालं ? इश्श ?"

बाबुरावांनी कपाळावरचा घाम पुसला.

" थांबा हं, चहा करून आणते म्हणजे जरा बरं वाटेल असं म्हणून शरयूबाई आत निघून गेल्या आणि बाबुराव त्यांच्या लयबद्ध चालीकडे आणि अजूनही टिकलेल्या त्यांच्या सुडौल बांध्याकडे एकाकीपणे पाहात राहिले अस्वस्थ होऊन ...

दोन मुलं मोठी झाल्यावरही शरयूबाईंनी आपली 'फिगर' दृष्ट लागण्यासारखी राखली होती. आणि त्यात भरीला गोड, हसतमुख, सुंदर चेहेरा आणि मनमोकळा स्वभाव यामुळे तर कोणावरही त्या प्रथमदर्शनीय छाप टाकीत. आपल्या मोहक हास्यानं भुरळ घालीत पण आपला आब राखून आणि दुसऱ्याला त्याची सतत जाणीव देऊन ! म्हणूनच बाबुराव निःशंक होते.

पण आज मात्र त्यांचं मन शंकेनं पेटून निघालं होतं संशयानं पछाडलं होतं ! या अवस्थेत आढ्याकडे पाहात त्याच परिस्थितीत बसून राहिलेल्या बाबुरावांना शरयूबाईंच्या शब्दानी जाग आणली.

"हं हा घ्या म्हणजे बरं वाटेल जरा." शरयूबाईंनी चहाचा कप ठेवून बाहेर जाता जाता बजावलं.



अनुक्रमणिका

" आता कशानंच वरं वाटणार नाही डॉक्टरांचा रिपोर्ट मिळेपर्यंत !" बाबूराव चहाकडे हताशपणे पाहात पुटपुटले.

कपाळावर परत परत फुटणारा घाम पुसून बाबुरावांनी कसाबसा चहा संपविला. आज त्यांना बायकोच्या हातचा चहासुद्धा कडवट लागला.

" हं. वरं वाटेल म्हणे ! माझ्या मनातली व्यथा कळली असती म्हणजे तुझीही माझ्यासारखीच अवस्था झाली असती." बाबुराव स्वत:शीच बोलू लागले.

आता काय म्हणावं या कर्माला ? इतका सगळा बंदोबस्त केला माझ्याकडून केला तरीही हे झालंच ! कसं आणि कधी झालं ? की आपल्यातच काही दोष? छे, छे, . . भलतंच काय काही तरी? आपलं सगळं ठीक आहे डॉक्टरच म्हणाले तसं. त्यांच्याकडून असली चूक होणंच शक्य नाही ! अगदी शंभर टक्के खात्री आहे त्यांना. त्यांनाच काय, त्यांच्याबद्दल आपल्यालासुद्धा आहे खात्री !

पण मग हे घडलंच कसं ?

" आपण नाहीच, तर मग शरयू काय नो. . नो. नो. ., अशक्य इंपॉसिबल " शरयूबाईंच्या बद्दलचा हा विचार बाबूराव जो जो झटकून टाकू लागले, तो तो त्यांच्या मनात शरयूबाईंनी अधिकच ठाण माडलं ! आणि बाबूराव जोरजोरानं दाढीचे खुंट उपटू लागले. मनाने अधिकच खचू लागले.

आहे शरयू सुरेख आहे. बोलण्या वागण्यात अत्यंत लाघवी आहे. चारचौघात अगदी मनापासून मिसळणारी आहे. आपल्या मित्रमंडळीबद्दल खूप अगत्य दाखविणारी आहे. पण व्यवहारात आणि विशेषत: आपल्यासारख्या वरच्या थरातील समाजात हे असं मिळून मिसळून वागावंच लागतं. कधी कधी मनात नसलं तरीही वरकरणी प्रेम दाखवावं लागतं !

आता आपले सगळेच मित्र तिला कुठे पटतात ?

काही मित्रांच्या फॅशनेबल बायका आणि त्यांचं ते आगाऊपणे पुढे पुढे करणं, लाडात येऊन आपल्याशी बोलणं हे तरी तिला कुठे आवडतंय? पण तिनं हे कधीच व्यक्त केलं नाही. की त्यांच्याही लक्षात येऊं दिलं नाही. काही मित्रांच्या सुंदर बायकांबद्दल आपल्याला जरा जास्तीच. जरा अधिकच आस्था वाटते तेही तिला माहीत आहे. पण ती सगळ्यांचं हसून, खेळून स्वागत करतेच . . .

फार काय गुप्त्याच्या बायकोचं सुद्धा ती अजून मनापासून स्वागत करते ! गुप्तेचं मुळीच लक्ष नसे तिच्याकडे—तो सदोदित पत्ते आणि बाटलीमध्ये दंग असे त्यामुळे ती नेहमी खिन्न असे. आणि हळव्या मनाच्या बाबुरावांना तिच्या सुंदर चेहेऱ्यावरची खिन्नता पाहून फार वाईट वाटे. . . तिच्याबद्दल सहानुभूती वाटे. ती सहानुभूती जसजशी वाढत होती तशी बाबुरावांचं गुप्तेकडलं जाणं-येणंही वाढलं होतं. पुष्कळ वेळा गुप्ते घरीच नसे. पण याला बाबुरावांचा तरी काय इलाज होता ? त्यांचं कर्तव्य ते करीत होते — केवळ तिच्या दु:खावर फुंकर घालण्यासाठी . . .

नाही म्हटलं तरी शरयूच्या लक्षात ही गोष्ट केव्हाच आली होती. पण तरीही तिनं एका शब्दानंही कधी आपल्याला विचारलं नाही की कुत्सितपणानं आपले वाभाडे काढले नाहीत ! कधी छेडलं नाही, की कधी संशयानं फटकून वागली नाही! अजूनही ती तिचं स्वागत करते. अगदी मनापासून ! इतकी समजुतदारपणानं ती वागते, आपल्यावर विश्वास दाखविते. . आणि असं असूनही पुन्हा आपण तिच्या बद्दलच असला घाणेरडा संशय ? . नाही. . नाही, नाही. बाबुरावांनी नकारार्थी मान हलविली.

पण खरं म्हणजे तिनं रागवायला हवं होतं ! बाबुरावाच्या मनात पुन्हा चक्र फिरू लागलं. नुसता संशय आला तरी बायका आकाश-पाताळ एक करतात घालून पाडून बोलत असतात. नुसता " चहा जमला नाही आज " एवढं बोलण्याचा अवकाश, की—

" जिच्याबरोबर जमलंय, तिलाच जमत असेल चांगला चहा. तिच्याच हाताला अधिक गोडी असेल " असला टोला शक्य असेल त्या त्या ठिकाणी हाणतात ! आणि ही तर नुसती 'इंडायरेक्टली' सुद्धा कधी काही बोलत नाही ! की नुसत्या चेहेऱ्यावरसुद्धा कधी संशय दाखवीत नाही ! ! असं कां असावं ? म्हणजे ही काय भानगड आहे ? काय सालं डोकंच काम देत नाहीय की आपण गुप्तेकडे असताना, गुप्ते नुसत्या कल्पनेनंच बाबुराव पांढरे फटक पडले.

नाही नाही. शरयूला असं वागण्याचं कारणचं नाही. आपण तिच्याकडे कधीच दुर्लक्ष केलं नाही की तिची कधी उपेक्षा केली नाही. आपण थोडेच गुप्तेसारखे आहोत ?

पण मग शरयूनं तरी आपलं काय कमी केलंय ? इतके वर्षं तिनं आपल्यातच इंटरेस्ट ठेवला. आपल्याला काय कमी होतं ? पण तरीसुद्धा आपण गुप्तेच्या बायकोच्या बाबतीत पाघळलोच नाही का ? गुप्ते कशाला पण आपण जरा अधिकच पाघळतो बायकांच्या विषयात ! बाबुरावांनी नकळतच स्वतःच्या मनाशी कबुली दिली आणि ते जरासे ओशाळलेच.

पण मग याच न्यायानं शरयूनं काही. नाही, नाही. हे— हे म्हणजे फारच झालं आता ! चांगल्या कुळशीलाची बाई स्वप्नात-सुद्धा असा विचार करणार नाही.

पण, पण मग हे झालं कसं ? कोण असेल हा हरामखोर शरयू-वर नजर ठेवणारा ? माझ्यावर असा सूड उगवणारा. ? गुप्त्या? तोच असणार ! ! माझ्या बायकोला फितवतो काय साला हंटरनं फोडून काढला पाहिजे माझ्या घरात शिरून माझ्याशी बेईमानी ? आणि हे अजून माझ्या लक्षात येऊ नये ? हरामखोर

बाबुरावांच्या अंगाचा नुसता तिळपापड झाला होता. आपला डाव आपल्यावरच उलटू शकतो ही नुसती कल्पनाही त्यांना सहन होत नव्हती. संशयानं बाबुरावांचं डोकं फिरण्याचं बाकी उरलं होतं. उलट सुलट विचारांच्या भोवऱ्यात ते फिरत होते पण नक्की अंदाज काहीच लागत नव्हता.

" पण याला पुरावा काय आहे ?" त्यांनी स्वतःला प्रश्न केला. " सिद्ध करू शकतोस तू तसं ? तशी हिमत आहे शरयूला विचारण्याची ? आणि तिनं तुझ्याच तोंडावर काही नावं फेकली तर ? तुझ्यावरच उलटेल हे बुमरँग कुठल्या तोंडानं जाब विचारणार आहेस तिला ?"

इथे " तेरी भी चूप—मेरी भी चूप !" म्हणजे शेवटी सगळंच गुपचूप नाहीतरी तू कुठे सांगितलीयस शरयूला तुझ्या ऑपरे-शनची भानगड ?

तिच्या आईच्या आजारपणात जवळ जवळ दोन महिने ती माहेरीच होती. तेवढ्यात तू हे ऑपरेशन करून घेतलंस. नी रागावेल म्हणून अजूनपर्यंत गुप्त ठेवलंस कारण ती या गोष्टीच्या पूर्णपणे विरुद्ध होती. ऑपरेशन म्हणजे तुला संपूर्ण स्वातंत्र्य बहाल करणं हे ती पक्की जाणून होती. आणि म्हणूनच ती विरुद्ध होती हे तुला पक्कं माहीत होतं. यामुळेच तर सर्व कारभार गुपचूप उरकलास.

हे सर्व ती आल्यानंतर तिला बोलला असतास, तर निदान हा प्रसंग तरी आला नसता. फार तर काय, रागावली असती चार दिवस आपल्यावर पण झाली गोष्ट परत थोडीच येणार होती ? खरं म्हणजे डॉक्टरसुद्धा तयार नव्हते मनापासून ! पण शेवटी त्यांचा आपला इतक्या वर्षांचा घरोबा लक्षात घेऊनच त्यांनी हे केलं. वास्तविक बायकोच्या संमतीशिवाय हे करणं म्हणजे गुन्हा आहे ! शरयूला हे कळल्यावर तिच्या रागाला फक्त तेच आवरू शकतील. तिला समजावू शकतील. पण हे सर्व मागाहून . . . शरयूला सर्व आधीच सांगितलं असतं तर हा प्रसंगच आला नसता. . बाबूराव आपल्या मनाला बजावीत राहिले. अधिकच हवालदिल झाले.

" हं, आलिया भोगासी असावे सादर. डॉक्टर बरी. शेवटी काहीच न सुचल्यामुळे बाबूराव स्वतःशीच पुटपुटत तिरी-मिरीने बाहेर पडले. आता काय तो सोक्षमोक्ष उद्या लागेलच. उगाच डोक्याला ताप देण्यात काय अर्थ आहे ? बाबुरावांनी निर्णय घेतला.

दुसऱ्या दिवशी डॉक्टरांकडे गेल्यावर त्यांची अवस्था जवळ जवळ बळी जाणाऱ्या बोकडासारखीच झाली होती. डॉक्टर काय सांगतात यावर आता त्यांचं जिणं अवलंबून होतं ! छाती धडधडत होती आणि घाम फुटत होता. शेवटी एकदाचा तो निर्णायक क्षण आला. डॉक्टरांच्या खोलीतून शरयू तपासणी होऊन बाहेर आली. बाबुरावांना तिच्याकडे पाहाण्याचं सुद्धा धैर्य झालं नाही . . .

" सगळं ठीक आहे पण तुम्हांला डॉक्टरांनी आत बोला-वलंय." शरयूबाईनी शांतपणे निरोप सांगितला.

आणि लटपटत्या पायानीच बाबूराव डॉक्टरांच्या खास आतल्या खोलीत गेले. " हं S S. खरी आहे तुझी शंका बाबूराव . . . शरयूला दिवसच गेले आहेत! "डॉक्टर सांगू लागले." माझ्या हातूनच काहीतरी गफलत झालीय. माझीच चूक आहे ही अशी माझी खात्री झालीय." डॉक्टर गंभीरपणे पराभूत आवाजात म्हणाले.

" पण तुम्हीच म्हणत होतात की तुमच्या हातून असला निष्काळजीपणा

" अरे पण शेवटी मीही माणूसच आहे. कितीही अनुभवी असलो, निष्णात असलो—तरी कधी कधी, कुठे तरी चूक होते—कमतरता राहून जाते आणि ऑपरेशन झालं तरीही अशी फसगत होऊ शकते ! अगदी क्वचितच पण हे घडू शकतं. वाईट इतकंच वाटतं की हे नेमकं तुझ्याच बाबतीत घडलं म्हणून "

"I am extremely sorry, Baburao" डॉक्टरांनी पुन्हा दिलगिरी प्रदर्शित केली.

पण आता यावर उपाय ? बाबुरावांनी जरासा सावरत प्रश्न केला.

" पुन्हा ऑपरेशन. उरलेला दोष काढून टाकणे अर्थातच – free of charge कारण चूक माझी आहे तेव्हा जबाबदारी माझीच ठरवू आपण लौकरच आपल्याला दोघांनाही सवड असेल तेव्हा. शक्यतो लवकरच डॉक्टर बाबुरावांच्या पाठीवर हात ठेवून बाहेर येत म्हणाले.

" मी सांगितलंय याला आता ऑपरेशन करून घ्यायला. डॉक्टर शरयूबाईकडे पाहात हसत, हसत म्हणाले,

आता तुम्ही सांगितलंत तरच ही परवानगी देईल. बाबुरावांनी डॉक्टरांची 'री' ओढली.

बराय, थँक्स डॉक्टर–शरयूचा प्रेमानं हात धरून बाबूराव दवाखान्याबाहेर पडले.

विलक्षण खुषीत येऊन बाबुरावांच्या मनावरचं संशय-पिशाच्च एकदम खाली उतरलं होतं. ते मजेनं शीळ घालीत डॉक्टरांना धन्यवाद देत होते. देवाचेही आभार मानीत होते ऑपरेशन फसल्याचं कळल्याबद्दल ! आता होऊ दे खुशाल आणखी एक अगदी बेलाशक बाबुरावांनी प्रेमानं शरयूबाईकडे पाहात विजयी नजरेनं डॉक्टरांच्या दवाखान्याकडे पाहिलं. डॉक्टर एकटेच खिडकीत उभे होते. बाबुरावांनी खुषीत येऊन हात हालविला – बाय, बाय केल्यासारखा. डॉक्टरांनी हसूनच त्यांना प्रतिसाद दिला आणि डॉक्टर परत खुर्चीत बसले.

इतक्या वर्षात आज प्रथमच डॉक्टरांचं गणित चुकलं होतं. डॉक्टर स्वतःलाच दोष देऊन आपल्या मनाला विचारीत होते

" स्वतःला एवढे मोठे डॉक्टर म्हणवतो आपण—लोकांना संततिनियमनाचे डोस पाजतो— फावल्या वेळात व्याख्यानं सुद्धा देतो— शेकडो लोकांची ऑपरेशन्स करतो पण एक गोष्ट आपल्या कशी लक्षात आली नाही ? आपल्यासारख्या माणसाला इतकी साधी गोष्ट कशी सुचली नाही ? म्हणजे बाबुरावांचं ऑपरेशन केल्यावर सुद्धा ? त्यांचं त्यांनाच आश्चर्य वाटलं—

स्वतःच्या निष्काळजीपणाचा–हलगर्जीपणाचा मनापासून रागही आला आणि आता शक्य तितक्या लवकर स्वतःचं ऑपरेशन करून घेण्याचा निश्चय करूनच ते दवाखान्याबाहेर पडले!

• • •

---

(पान ४३ वरून–अणुबॉम्ब)

आपले वर्चस्व जगावर कायम ठेवावयाचे आहे. जर भारतासारखी इतर राष्ट्रे अण्वस्त्र दल ठेऊ लागली तर बड्यांचा मोठेपणा व महत्त्व कमी होईल अशी भीतीही या राष्ट्रांना वाटते.

दोन वर्षांपूर्वी लिनॉर्ड विटन यांनी अशी सूचना केली की ब्रिटनने नॉटोमधील आपल्या अण्वस्त्र दलाचा काही भाग काढून त्यांचे राष्ट्रकुल दल म्हणून पुनर्रचना करावी व ते दल आशियात ठेवावे त्यामुळे भारत, मलेशिया, आस्ट्रेलिया व न्यूझिलंड इत्यादि राष्ट्रांना अण्वस्त्राचे संरक्षण मिळेल. या सुचनेला अनुसरून मॉयकेल एडवर्ड यांनी 'इंडिया, पाकिस्तान अॅण्ड न्यूक्लिअर वीपन' या लेखात जे विचार मांडले आहेत ते लक्षात घेण्यासारखे आहेत. ते म्हणतात –

I am not convinced, however that such plan—or even a joint American—Russian nuclear commitment—could divert the present trend in Indian Policy. There remains the ironic indeed tragic, possibility that in the absence of any positive gesture by the Great Powers, India may shortly regain her international status at the cost of destroying the present nuclear balance. ( इंटरनॅशनल अफेअर्स, ऑक्टोबर १९६७)

यावरून पश्चिमी राष्ट्रांना भारताने अण्वस्त्र निर्मती कां करू नये हे सहज समजून येईल. बडी राष्ट्रे आपले वर्चस्व कायम ठेवण्याकरिता इतर राष्ट्रांनी अण्वस्त्र निर्मिती करू नये म्हणून त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करतील व तें न जमल्यास त्यांच्यावर आर्थिक व राजकीय दडपण आणण्याचा प्रयत्नही करतील. तेव्हा या गोष्टींचा आपण विचार केला पाहिजे. जर वर उल्लेखिलेल्या महत्त्वाच्या बाबी बड्या राष्ट्रांकडून अण्वस्त्र-प्रसार बंदी करारातून डावलल्या जात असतील, तर आपल्या संरक्षणाकरिता आपण स्वतंत्र अंण्वस्त्र दल तयार करणे हेंच योग्य ठरेल. मग बड्यांचे कितीही मोठे दडपण येवो. संकटाच्या वेळी आपणास कोणीही उपयोगी पडत नाही याचा अनुभव चीन व पाकिस्तानच्या युद्धाच्या वेळी आलेला आहे. तेव्हा हा अनुभव लक्षात घेऊन आपण आपले अण्वस्त्राचे स्वतंत्र धोरण आंखणे महत्त्वाचे आहे. नाहीतर मागावून पश्चात्ताप पावण्याची वेळ यावयाची.

• • •



अनुक्रमणिका

(पान १८ वरून–कादंबरी)

" म्हटलांव काकाचीच गाठ घेवयां."

" हॅच्या ! मग नुसता नोकराकरवी निरोप पाठवला असता तरी मी वागेकडे वळलो असतो. गावातच तर वाग तुमची."

" येवरी तुमची मोहवत होती तर परकरन पोलीसात कसां काय गेलांव ?" अबुबकरने प्रश्नाला सरळ सरळ हात घातला.

" तो सगळा घोटाळा झाला. खरं म्हणजे कोर्टात जाण्याच्या मी सुरवातीपासून विरुद्ध होतो."

" आता परत असां होता कामा नाय !"

" हे काय सांगायला हवं शेट ?"

" ते काय नाय. आता परत असां होता कामा नाय म्हनूनशान अमी कायम बंदोवस्त करनार."

" माझ्या लक्षात नाही आलं."

"तुमी समदे लोकानी गाव खाली करा तावरतोव !"

" आम्ही ? आणि हा गाव खाली करायचा ?"

" तुमीच ! तुमीच समदे लोकानी गाव खाली केला पायजे."

" अहो काय सांगता काय शेट ? तुमच्या आमच्या पिढ्यान् पिढ्या इथे एकत्रपणे गेल्या. कधी दंगा नाही, धोपा नाही."

" आमचां इथे राज होतां आठसे वर्षां ! तुमची नि अमची बरोवरी नाय."

" ते राज्य बुडालं. आता व्रिटिशांचं राज्य आहे. नि उद्या कदाचित हिटलेराचंही येईल !"

" ते व्रिटेश नि अमी वगून घेंव. तुमी गाव अमाला खाली करून द्या तावरतोव.

" पण ते काय माझ्या हातात आहे ?"

" तुमी गावाचे पुढारी हायेत."

" बाबा, मी नाही ते तुळसकरशेट पुढारी आहेत."

" राजापुरास कोन गेलावतां ? तुमीच ना ? मग पुढारी कोन ?"

" असं बघा शेट, थोडा काळ निघून गेला की आपोआप सर्वजण शांत होतील."

" अमी ते जानत नाय. तुमी सगला गाव खाली करून द्या तावरतोव. बेकार बक्वास नाय पायजे." अबुबकरने आवाज चढवून सांगितलं.

" असं भांडणं तुमच्या इस्लाम धर्मात बसत नाही."

" अमी सगलां इस्लाम जानतो. इस्लाम म्हंजे शांतता. अमाला शांतता पायजे. ने, म्हनून तुमी अमाला सगला गाव खाली करून द्या तावरतोव ! अमाला तुमचेबरोबर भांडन नकु. अमला शांतता पायजे."

अबुबकर ढीम् करायला तयार नाही हे पाहून काकांचा नाईलाज झाला. त्याच्या हातातली हस्तीदंती मुठीची काठी ही तरवारीचं पातं पोटात सामावून घेतलेली गुप्ती आहे, हेही काकांनी ताडलं. तेव्हा शांतपणे त्यांनी सांगितलं,

"ठीक आहे. आता तुमचं-माझं जे बोलणं झालं ते मी जमंच्या तसं आमच्या मंडळीना सांगतो. आज अनायासे गुरुवारही आहे. आम्ही दत्ताच्या आरतीला सगळे जमतो. तिथेच सर्वांना सांगतो."

" नुसतां सांगू नकात. अमाला गाव खाली करून पायजे तावरतोव. ने, राजापुरात पोलीसाना सांगून काय होनार नाय ते पन सांगा. अमी सगला बंदोवस्त केलांव तुमचे अगद्दूर ! अमाला आपलां गाव खाली करून द्या, मग झालां."

कानावर विश्वास ठेवत; न ठेवत काका बावीशेटांच्या दुकानात आले. त्यांची दखल कुणीच घेतली नाही, कारण सांजेचं गिऱ्हाईक जमा झालेलं होतं. बावीशेट स्वतःच कुणाच्या बाटलीत घासलेट, कुणाच्या बाटलीत खोबरेल, कुणाच्या पिशवीत गूळ, असं करीत होते. आकाशातली मळभट, अंगणातली गर्दी आणि पेट्रोमॅक्सच्या बत्तीचा जळजळाट ह्यामुळे त्यांचा जीव पुरता कावून गेला होता. घामाने निथळत असलेल्या त्यांच्या उघड्या काळ्या अंगावर प्रकाशाचे बिल्ले चकचकत होते.

" थोडा वेळ काढणार काय ?" काकांनी विचारलं.

" श्वास तरी टाकायला फुरसत मिळत्याय काय मला ?"

" पण काम तसंच निकडीचं आहे.

" हात जोडतो काका, पण ह्या क्षणी ब्रह्मदेव आला तरीसुद्धा शक्य नाही मला."

" अवघी पाच मिनिटं—"

" पाच सेकंद पण नाही आणि आज दत्ताच्या आरतीला जमूच की. तेव्हा बोलूया."

" आता बोललो असतो म्हणजे —"

" फार महत्त्वाचं आहे ?"

---

## एकेकाचा चंद्र !



भारतातही 'जंत'राळवीर चंद्राभोवती घिरट्या घालत आहेत !

---

" खरंच आहे."

" मग सांजेचं नको बोलुया. तुम्ही असं करा— वाटुळकर-मामाना गाठा."

" हे सांगितलंत एवढ्या वेळात माझं सांगून झालं असतं."

" दिवेलागणीला नको. तुम्ही वाटुळकरमामाना गाठा. नि रात्री भेटतोच आहोत आपण."

काका नाईलाजाने निघाले. चार गडगे टाकून भैरव पाखाडी-तल्या वाटुळकरांच्या परसवात वळले. पडवीत फक्त समई तेवत होती. जवळपास माणूस दिसत नव्हतं. काकानी मामाना हाक घातली. वहिनी पुढे आल्या.

" मामा कुठायत ?"

" बाहेर गेल्यायत. कोण ? काका काय ? आत या नं."

" केव्हा येतील ?"

" तरी कल्लाक लागेल ! पण तुम्ही बाहेर का ? आत या नं."

" असूदे."

" असू दे कसं ? घोटभर चहा ठेवल्ये."

" गरमा होतोय मरणाचा. चहा कशाला ?"

" पण निदान बसा तरी खरे."

" कुठपत गेल्यायत ?"

" भक्तीणीकडे."

" का बुवा ?"

" थोडं देवाचं काम चाललंय."

" बोलले नाहीत पण !"

" काय बोलणार ? आमची शकू आहे ना मुंबैस ?"

" बरं. मग तिचं काय ?"

" तिला तीन ठिकाणी दाखवलीनी, पण कुठेच जमत नाही. म्हटल कोण आडवं येतांय ते तरी बघा. म्हणून नारळ घेऊन गेल्यायत."

" भक्तीणीकडे ?"

" हो. म्हणजे काय बाधत असलं तर बंदोबस्त करू. खरं की खोटं ? वेळीच उजवायला हवी मुलगी. नाही ?"

" बरं तर. आम्ही रात्री भेटूच आरतीला."

"आता इतके उभे राहीलात, तर घोटभर चहा तरी घ्यायचा."

"पुन्हा येईन."

" असं म्हणता नि येत नाही. आमचा चहा चालतो ना?"

"चहाच का ? शकूची सोयरीक जमली की वडेच खायला येतो."

काका घरी परतले. काकू तिष्ठत बसल्या होत्या.

" आज काय पराक्रम केलेत ?"

" माझ्या जीवाला लागलाय काच नि तुम्ही हिणवत बसा !"

" जीवाला काच लागलाय ना ? मग बरं झालं. दुसऱ्याच्या जीवाला काच लागला की कसे पेटके येतात पोटात ते आता तुम्हाला बेश कळेल."

" तुम्ही पाटपाणी ठेवा पाहू."

" ठेवल्ये. पण राजापुराला धारा भरायला जायचंय तुम्हाला ठाऊक आहे ना ?"

" राजापुराला जायचं हे नक्कीच. पण धारा भरायला की जीव द्यायला ते पुढे ठरवू."

" जीव बरे द्याल तुम्ही ? तुम्ही म्हणजे दुसऱ्यांचे जीव जाताना बघत बसणार !"

ह्यापुढे अधिक बोलण्यात अर्थ नव्हता. जेवण उरकून काका दत्ताच्या देवळात आरतीला हजर झाले. बाबीशेट, वाटुळकरमामा, विठू तलाठी, नामा गुरव, भीमी भक्तीण, सारे हजर होते. भजन संपल्यावर मंजिनाथाने सर्वांच्या हातावर खिरापत ठेवली. काका योग्य संधीची वाट पहात होते.

" जरा मंडळीना थांबवून घ्या. " काकांनी सूचना केली. सर्वांना ती मान्य झाली.

" बोला, काय सांगणार होतात काका ?"

" आता उत्सुकता दाखवता. त्यावेळी भाव चढलावता."

" पण आता अनायासे सगळेच जमल्यायत."

" सगळ्यांची ऐकायची तयारी आहे ?"

" हा काय प्रश्न ?"

" सगळ्यांची ऐकायची तयारी आहे काय ते सांगा."

" नवंच लफडं दिसतंय."

" नुसतं लफडं नाही; अंगाशी येणारं लफडं !"

" काय म्हणता तरी काय काका ?"

" आता ऐका तर —"

" ऐका रे बाबानो, ऐका !"

" मोहल्लेवाले आपल्याला गाव सोडून जायला सांगताहेत !"

"काय !"

" मी बोललो त्यातलं अक्षर न् अक्षर खरं आहे."

" आम्ही गाव सोडायचं नि इथे कोण राहाणार ?"

" फक्त मोहल्लेवाले."

" मोगलाई लागून राहील्याय काय हो ! म्हणावं हिंमत असेल तर पुढे या नि बोला —जीभ छाटून टाकू !"

" पण हा निरोप अगोदर तुमच्यापर्यंत आलाच कसा ?"

" अबुबकरशेट भेटला होता. तो म्हणाला."

" नाही तरी हल्ली त्याला चरबी चढल्यायच मूळी ! शिवाय वॉर फंडाला शंभरी मोजलीन् ना !"

" मी त्याला सगळं समजावून सांगितलं."

" इथेच चुकलं तुमचं. तुम्ही असल्या खवूडाना चुचकारता कशासाठी ? आम्ही हिंदूच आपल्या पायावर धोंडा मारून घेतो !"

" आपल्याकडून आपण सामोपचारानं घेतलेलं असलं म्हणजे बरं असतं. तशात परवा तो घोटाळा होऊन बसलेला. तोंड आहे आपल्याला आवाज चढवायला ? गाई परी गाय मिळाली नि महंमद मास्तराला मात्र चार तडाखे खावे लागले."

अनुक्रमणिका






" असे आपण विचार करीत बसतो नि मरतो. जिथे रट्टे द्यायचे तिथे रट्टेच दिले पाहिजेत."

" पण मुत्सद्देगिरी म्हणून काही असतेच की नाही ?"

" ते तुम्ही सांगू नका हो काका. योग्य वेळी योग्य गोष्ट केली पाहिजे. शिवाजीने वेळ आली तेव्हा खानाला फाडलानच् की नाही?"

" तो काळ वेगळा होता."

" खरं म्हणजे ती माणसंच वेगळी होती असं बोला. आता ही सगळी भेंड्यांची भाजी झाल्याय."

" म मी अबुबकऱ्याचं काय करायचं होतं ? मटण ?"

" त्याला इथे आणायचा. मग आम्ही नीट फैलावर घेतला असता."

" प्रकरण वाटतं तितकं सोपं नाही."

" आणि गाव खाली करून मागायला लाज नाही वाटली त्याला? आमच्या वाडवडलांची भूमी आहे ही ! कोण होतं ह्या चिवाव्यात सुरवातीला ? तुम्ही नि आम्हीच नं ? की ह्या अबुबकऱ्याचा पणजा ? मूळचं आगरं शिपणारं पोर; रेषा फुटली नि बागाईतदार झाला. नि आज आम्हाला म्हणतोय गाव खाली करून द्या ! म्हणावं पुन्हा तर बोल, लुंगी सोडून घेईन भर बाजारात !"

" समजा, त्या लोकानी काही दगा फटका केला तर ?"

"तुम्ही दत्ताचा अंगारा लावलाय नं ? मग काहीसुद्धा होणार नाही. मी–मी म्हणणारी भुतंसुद्धा पळतात अंगाऱ्यासमोर, तिथे अबुबकऱ्याचा पाड काय ?"

" पण समजा, इतकं सर्व करून त्यानी आगळीक काढलीच; तर ?"

" आपण उद्या पोलीसात खबर देऊया राजापुराला."

" नको; पोलीसातलं एक प्रकरण आपल्या अंगाशी आलंय."

" आलं असेल ! पण म्हणून काय पोलीसांकडे आपण पुन्हा जायचं नाही ? मग काम काय त्यांचं ?"

" आता पोलीसात आपण गेलो तर जोड्यासमोरसुद्धा हेगिष्टे उभा करणार नाही आपल्याला. तोंडघशी पाडलंय आपण त्याला."

" अहो, सोडून द्या हो गोष्टी–दाम करी काम !"

" मग तेच पैसे आपण मोहल्लेवाल्याना चारूया नि प्रकरण मिटवूया ! फार फार तर काय, घरटी दोन-चार रुपयांची पट्टी बसेल. पण निर्धास्तपणे झोपू तर खरे !"

" आपलं चुकतं ते इथे."

" अजिबात नाही. नेहमी तत्त्व कामी नाही यायचं. व्यवहार पहावा लागतो."

" तो नामर्दाना; आम्हाला नव्हे."

" असं आज म्हणू नि उद्या शरण जाऊ – असं करू नका."

" मी सांगितलं नं की कुणी काळजी करायचं कारण नाही म्हणून. सर्वांचं रक्षण होईल; चिवाई बघत्याय सगळं."

" ठीक. मी अबुबकरला काय सांगू ? उद्या गाठील तो मला."

"त्याला म्हणावं. गाव म्हणजे काय त्याच्या बापसाची पेंड काय? म्हणावं तूच चालता हो इथून !"

गोष्टी इथपर्यंत आल्या, तसे काका हरले. बसक्या आवाजात मोहल्लेवाल्यांचे आईबाप उद्धारत मंडळी घरोघर परतली. तुळस-करांच्या पडवीजवळ आल्यावर बावीशेट काकाना म्हणाले,

" काही काळजी करू नका तुम्ही, काका. आणि समजा भीती वाटलीच, तर रात्री इथेच या वस्तीला. एवढा दत्ताचा अंगारा लावता नि त्याच्या शक्तीवर विश्वास नाही तुमचा ?"

" आहे हो आहे ! देवावर विश्वास नसून कसं चालेल ? पण दैत्यांचा म्हणूनसुद्धा काही महिमा असतोच ना !"

" दैत्यांचे दात उपटून हातावर नाही ठेवले तर नाव नाही सांगणार तुळसकरांच्या वंशाचं ! जा, झोपा देवाचं नाव घेऊन."

काळोखातून काका घरी परतले.

## [ ११ ]

बावीशेटना दुकानासाठी लागणाऱ्या किराण्याची यादी दप्तरात घालन विठू तलाठी पहिल्या कोंबड्याला विष्णु भटाच्या अंगणात हजर झाला. विष्णू भटाने पंचाची गाठ घट्ट केली, दशम्यांची पिशवी पाठी-वर मारली, दाराला नुसती कडी घालून घेतली ते दोघेजण बापूंची घाटी चढू लागले. विष्णू म्हणाला,

"तुझे तरी डोके नामी हो! बावीशेटचा नोकर निळो चालता झाला मुंबैस, पण निळोचे राजापुराचे सगळे काम कसे अगदी ळ्ळपकी करून दाखवलेंस तू!"

"जाता जाता होऊन जातं हो भटजी. सरकारी दप्तर ऐतवाराच्या आत कचेरीत हजर करावंच लागतं. तेव्हा जाताना बावी-शेची चिठी घेतो नि परतताना गोणता भरून किराणा घेऊन येतो. यासाठी आपल्याला इस्पेशल हेलपाटा घालावा लागत नाही तो नाहीच, नि शिवाय दर खेपेला बावीशेट चकचकीत रुपया सोडतो."

"अरे काय म्हणतोस रे काय गुलामा? म्हणजे महिन्याकाठी चार रुपये मोफतात गाठतात म्हणायचे !"

"चार कां? कधी कधी पाच पण होतात."

"पूर्वजन्मीची पुण्याई रे ही विठो! नाही तर ही माझी कुत्तरओढ बघ!"

"कुत्तरओढ म्हणता तोंडानी पण पर-सोद्याला हातात घेणार पुजेची दक्षिणा सव्वा रुपया! नि शिवाय पेलाभर दूध नि पावशेर रवा सुटेल तो वेगळाच. हे नशिब नव्हे ?"

"अशी सव्वा रुपयाची नारायणाची पूजा वर्षाकाठी एकदोनदाच भेटते रे. बाकी वरीष द्वादशीच्या शिध्यावरच ढकलावं लागतं. असाच कुणाचा निरोपविरोप निघाला तर चार-आठ आण्याच्या दिडक्या सुटतात. पण त्यात काय जीव आहे?"

"पण तुम्हाला दक्षिणा बसल्या बसल्या मिळते. मला पाठीवर मणभर ओझं घेऊन सात कोस तुडवावे लागतत !"

"अरे तरणा माणूस तू ! तुला रे कसली धाड भरल्याय?".

अशी एकमेकांची नशिबं तोलत तोलत त्यांनी घाटी पकडली होती. सूर्य वर येऊ लागला होता. त्याच्या रेशमी किरणानी

अनुक्रमणिका








कोकणचं सगळं जंगल उजळून काढलं होतं. खोलगटातलं धुकं अस्ते अस्ते तरंगत वर येत होतं. प्रकाशात झाडंमाडं स्पष्ट दिसू लागली होती. हा साग, ही वाभळ, ही वोर, हा पांगारा असं स्वच्छ दिसू लागलं होतं. पक्ष्यांची भिरभीर कोवळ्या उन्हात सुरू झाली होती.

तासाभरात ते दोघे परसोद्याच्या फाट्यावर आले. विठू म्हणाला,

"माझा नेम नाही केव्हा परतेन त्याचा. भाऊसाहेवानी कागद पाहीले नि किराणा मिळाला, तर रातोरातही परतेन. नाही तर उद्याची संध्याकाळ हीच खरी."

"आणि आणखी चार दिवस का राहीनास? तलाठीभाऊ तू! जाशील तिथे भोजन तयार तुझे!"

"पूर्वी होतं. पण ह्या हिटलेरान् सगळा पो घातलान्!"

विष्णू भट मनसोक्त हसला. इतक्यात, ते दोघे उभे होते तिथल्या दगडीच्या आडून चार लोक दांडे घेऊन हजर झाले. त्यांच्यापैकी एकाने विठूची गर्दन धरली. मेलेल्या सापासारखा विठू त्याच्या मुठीत लोंवकळत राहिला. उरलेल्या तिघानी विष्णुभटाची नुसती झडप टाकून वोवडी वळवली. त्याला व्रम्हांड आठवलं. एकानं विचारलं,

"किधर जा रहे हैं तुम लोग?"

"पूजा सांगायला चाललोय परसोद्याला."

"नही; तुम राजापूर जा रहे हैं पोलीसके पास."

"नाही हो, नारायणाशपथ सांगतो, मी परसोद्याला निघालोय."

"झूट वोलेगा तो गर्दन छाट दुंगा तुम्हारी! याद रखना."

"राजापुरास माझे व्राम्हणाचे काम काय असायचेंय? ते तलाठीभाऊ राजापुरास चालल्यायत. मी नव्हे. मी इथे वाकणावर वळत होतो."

"ये आदमी कौन है?"

"मी विठू रहाटे. चिवाव्याचा तलाठी." विठूने थरथरत जाव दिला.

"किधर जा रहा है?"

"भाऊसाहेवांजवळ सातवाऱ्यांची वही दाखवायला."

त्या चौघांपैकी एकाने उरलेल्या तिघाना फर्मावलं, "ये वम्मन को पेडके पास लेके जाव. हम ये मुसाफीरोको सीधा करुंगा अकेला."

त्या तिघानी विष्णू भटाला तिववत दूर झाडाखाली ओढत ढकलत नेलं. सुकलेल्या अळूच्या पानासारखा चोळामोळा होऊन भट सावलीत गुपचूप वसून राहिला. चौथ्याने तलाठ्याला ढकलत दूर नेलं. तलाठी पांढरा फटफटीत पडला.

"सच्ची वोल; तुम कहां चले थे?"

"राजापुराला. भाऊसाहेवांकडे. हे दप्तर पहा हवं तर."

"याने तुम सरकारी आदमी है."

"होय साहेव."

"कितना पैसा है तुम्हारे पास?

"गरीवाकडे काय असणार सरकार?

माझा स्वतःचा एक रुपया आहे नि बाबी-शेटच्या किराण्याचे बावीस रुपये आहेत."

हे ऐकून तो तलाठ्याच्या कानात कुजबुजला,

"हम आपको बीस रुपया जादा देता हूँ. लेकीन एक बात करना. आप राजापूर जावो, लेकीन ये बात किसीको भी नही कहना."

"चालेल सरकार."

"और तीन दिन यहां वापस नही आना."

"तरीही चालेल."

"और जब चौथा दिन तुम यहां आएंगा, तो हम तुमको दस रुपया जादा बक्षीस दूंगा."

तलाठ्याची कळी खुलली. हातात पड-लेले रोख वीस रुपये टोपीच्या आत दडवून तो राजापूरच्या दिशेने धूम धावत सुटला.

चौथा झाडाखालच्या तिघांकडे गेला. पळणाऱ्या तलाठ्याला बघून बावचळलेल्या भटाला नुसत्या आवाजाने उभं करीत म्हणाला,

"क्यों रे बम्मन, सच्ची बोल, तुम किधर चल रहे थे?"

"परसोद्याला. तुमच्या पायांची शपथ!"

"क्यों?"

"शेटचांकडे नारायणाची पूजा सांगायला."

"हम ए कुछ नही जानता. तुम जहांसे आये, वहां पिछे जाव! बेकार बम्मन!"

विष्णु भटाला सोडता सोडता एकाने त्याच्या पाठीत जोरात तडाखा घातला. त्या धपाटचाने वाकडा होत होत विष्णु भट चिवाळ्याच्या दिशेने धावत धापा टाकीत टाकीत घाटी उतरू लागला. तीन मैल तो तसाच तिरमिरत, पंचा सावरत सावरत खाली आला नि थेट बाबीशेटच्या दुकानात दाखल झाला.

"काय हो भटजी, सकाळचे कसे?" बाबीशेटने विचारलं.

"माझे कर्म हो! दुसरे काय?"

"म्हणजे प्रकार तरी काय आहे?"

"माझा सव्वा रुपया बुडाला हो!" भटाने गळा काढला.

"मग त्यात काय आहे? मिळवाल परत."

"आता ते होणे नाही; कदापीही होणे नाही."

"सव्वा रुपया मिळणार नाही! काय वेड-बीड तर लागलेलं नाही ना?"

"आता कसचा दिसतो सव्वा रुपया? त्यानी गावाच्या सरहद्दी रोखून धर-ल्यानी—आता मी कसचा पोहोचतो पर-सोद्याला?"

"काय? गावाच्या सरहद्दी रोखून धरल्या? नि कुणी?"

"मोहल्लेवाल्यांच्या मारेकऱ्यानी!"

"खरं?" बाबीशेटानी चमकून विचा-रलं.

"गायत्रीच्या शेपटी शप्पथ!"

"नि विठो कुठाय?"

"तो धूम पळाला राजापुरास."

"बारदानाचे काय केलेन?"

"ते घेऊन पळाला."

बाबीशेटांनी गिऱ्हाईक परत लावून दुकानाच्या फळ्या लावून घेतल्या आणि माणसांकरवी काकाना निरोप पाठवला. निरोप ऐकून भेदरलेले काका वाटेवरल्या वाटूळकरमामाना घेऊन लटपटत आले.

"तुमचे शब्द खरे ठरले काका!"

"मी केव्हापासून तुम्हाला जागं करतोय?"

"मानलं! पण आता काय करायचं?"

"अगोदर सर्व हिंदूना तुमच्या पडवीत एकत्र जमवा. पुढचं पुढे बघू."

"की दोन हात करायचे?"

"कोण करणार? एक तरी तरणा माणूस आहे आपल्या बाजूला? सगळे मुंबईला पळाल्यायत्!" काका निराशेने बोलले.

"तेही खोटं नाही."

"मग काका, आपण काय करायचं? तुम्हीच सांगा."

"प्राणाशी बेतलं तर गाव सोडायचं."

"चिवाईला कालच नवस केलाय् मी—शकच्या लग्नाबाबत."

"नवसबिवस नंतर पाहू. अगोदर जीव कसा बचेल ते बघा."

जीव सर्वानाच प्यारा होता. दुभंगलेली मनं सावरीत, सारेजण आपापल्या माण-साना तुळसकरांच्या पडवीत आणायसाठी दाही दिशेने धावत सुटले.

तुळसकरांचं तोंड चिमणीएवढं झालं.

* *

## [ १२ ]

तुळसकरांचं अंगण म्हणजे जत्राच झाली. म्हातारे–कोतारे, बायका, त्यांची पिलाकुळ, ह्या सर्वांचा एकच गदारोळ

## जॅकेलीन, हे तूं कसं केलंस?

सुविख्यात साहित्यिक श्री. पु. भा. भावे यांनी पूर्वाश्रमींच्या जॅकेलीन यांच्या अलिकडेच झालेल्या पुनर्विवाहाबाबत खास लिहिलेला लेख थोडा उशीरा हाती आल्याने या अंकात प्रसिद्ध होऊ शकला नाही. सदर लेख पुढील अंकात प्रसिद्ध होईल.

— संपादक





उठला. मागीलदारी चुलखंडावर भात-पिठलं झालं. उकडांब्यांबरोबर सर्वांनी त्याचा चट्टामट्टा करून टाकला. सर्वांनी आपली गुरंढोरं तुळसकरांच्या गडग्यात बांधून ठेवली. त्याना चारापाणी दाखवता दाखवता गावकऱ्यांच्या छात्याच उसवायच्या बाकी राहिल्या. आंधळे वैकुंठबावा निंबाच्या सावलीत गुपचाप बसले होते. त्यांनी विचारलं,

"असं टांगळून कुठवर बसायचं इथं?"

"आता आंधळयाना पण घाई सुटली का? अबो, माणसं पोपई वागेत गेल्यायत समजुती घालायला. आमाला कालजी पडल्याय ते माघारी कसे येताहेत त्याची, नि तुमी म्हंता असं कुठवर बसायचं!"

"मग इतकं टाफरून ग कशाला सांगतीस? काय तुझ्या बाच्या खळचात बसल्यायत काय मानसं? अग बा ग बा!" वैकुंठबावा उसळले.

"नव्हं, आंधळेबावा जण सवताच्या पडवीवर बसल्यायत! काय बोलणं पण!"

"हां हां, माझी पडवी हाय ही! बाबीशेटला श्रीगणेशा मीनी शिकवलाय."

"आता न भांडायला काय घ्याल? आमच्या पाठीस लागलाय भोग. तो निस्तरू दे नि मग सावकाशीनं भांडणं भांडू आपण."

"कोण कोण गेल्यायत?"

"बाबीशेट, काका, वाटुळीकरमामा—"

"चौथा न्यायला हवा होता. तिघाच्यानी काम नाही व्हायचं."

"आता कुणी शंकाकुशंका काढू नकात बाई."

वैकुंठबावा गप्प बसले. मग चटकन् आठवण झाल्यागत त्यानी विचारलं,

"आज आगराला पाणी न्हाई दाखवलं? पानवेली नवीनच लावल्यान् आहेत ना बाबीशेटान्?"

"डोळे नसतानासुद्धा बाबा तुमचं इतकं लक्ष! नजर असती तर गावाला आग लावली असतीत!"

"आपुन ह्या गावातलं पान्-न्-पान् आपलं मानलंय."

"पण आज प्रसंग काय हाये नि तुमचं मन कुठं धावतंय!"

"जुनं हाड आहे!" वैकुंठबावांनी संतोषानं सांगितलं.

ताई जातीनं सर्वांचं हवं–नको पहात होत्या.

पहिला चहा पिऊन पोपई वागेत गेलेली माणसं सूर्य डोईस आला तरी परतली नाहीत, तेव्हा मागे राहिलेल्या सर्वांच्याच कंठाशी प्राण आले. तुळसकरांच्या अंगणात जमलेली माणसं उन्हात तळपणाऱ्या वाटेकडे डोळे लावून बसली. ताई म्हणाल्या "हे सगळे रामायण मेले माझ्याचमुळे झाले हो!"

उन्हाने सगळे डोंगर पेटून निघाले होते. उंच झाडं उजाड वाटत होती. वारा पडला होता. पान हलत नव्हतं की पाखरू बोलत नव्हतं. कोकणातली ती प्रखर निरव दुपार सुन्न पडली होती.

"अरे, कुणाला तरी पाठवा रे पोपई वागेत नि बघा माणसं काय म्हणताहेत ती. बसून बसून कंटाळलेल्या वैकुंठबावानी सूचना केली. ती तत्काळ सर्वांनी हाणून पाडली.

वेळ मुंगीच्या पावलाने जाऊ लागला. दुपार तीळ तीळ वाढू लागली. ऊन टोचू लागलं.

रणरणत्या उन्हातून तिघेजण परत आले. कोणी कुणाशी बोलत नव्हतं. आल्यावरोबर ते आडावर गेले. हातपाय धुतल्यावर बाबीशेट इतराना ऐकू जाईल इतक्या मोठयानं स्वतःशीच बोलले, "चला, अखेर चिवाईच्या कृपेने अरिष्ट टळले!"

हे ऐकल्यावर सर्वांचे जीव टचकन फुलून आले. निंबाच्या झाडाखालून वैकुंठबावानी विचारलं,

"म्हणजे मंडळी घरी जायला मोकळी झाली म्हण की.

"इतक्यात घाई नको." काकानी इशारा दिला.

"झालं काय काय ते तर सांगाल?"

"काय व्हायचंय ह्या काकाना नि वाटुळकरमामाना घेऊन मी पोपई बागेत गेलो. नोकराकडून अबुबकऱ्याला वर्दी दिली. तर निरोप आला, 'शेट झोपल्यायत. थांबलो. परत निरोप पाठवला. तरी आपला शेट झोपलेलाच. पण मी कसला खमक्या. परत थांबलो. परत निरोप पाठवला. तर उत्तर आलं. शेट नमाजीला गेल्यायत. परत थांबलो तो आत्तापर्यंत—पण शेटचा पत्ता म्हणून कसा तो नाही! अर्थ सरळ आहे—शेट टरकला!"

"असं इतक्यातच म्हणणं कठीण आहे."

"कठीणबिठीण काही नाही. मी सांगतो—अबुबकऱ्या टरकला."

"तो जर असा डरपोक असता तर विष्ण्या भटाला सकाळी मारेकऱ्यांकरवी फाटयावर आडवताच ना."

"हेच तर तुम्हाला कळत नाही. एकटया दुकटया हिंदूना खिंडीत गाठून रट्टे देणं वेगळं नि अख्ख्या गावाला दहशत बसवणं वेगळं."

"तथास्तु! आम्ही चिवाईचे नवस फेडायला मोकळे झालो."

"तुमचे कसले आल्यायत नवस आता?"

"आमची शकू नाही का मुंबैस?"

"तिचं काय?"

"स्थळं बघतो आहोत. लवकर जमलं तर चिवाईला कोंबडं बोलल्योय.

"तुमचा नवस फळतोय—सोळा आणे फळतोय. नि तो फेडायला तुम्ही चिवाच्यातच राहाताय्. बाबीशेटानी वाटुळकरमामाना दिलासा दिला. नंतर ते पुढे म्हणाले, "बोला, तुमच्यापैकी जेवायचं कोण राहिलंय?"

"आम्ही पिठलं भात चापला.

"चापलात ना? मग आता आम्ही पानावर बसायला मोकळे झालो.

माजघरात तिघांचं जेवण सुरू झालं. काका सांगू लागले,

"तसा अबुबकरचा विश्वास धरू नका. उलटया काळजाचा आहे तो."




"ते उलटचाचं सुलटं करणं माझ्याकडे लागलं."

"गांववाल्याना एव्हाच परतायला सांगू नका."

"माझी लेकरं ती ! मी कशाला त्याना हाकलू ?"

"एरव्ही मी काही म्हटलं नसतं. पण आजचा प्रसंग —"

"तुम्ही विसरा हो काका त्या अबुबकऱ्याला! चांगले झकासपैकी जेवा नि डोक्याखाली हात घेऊन निर्धास्तपणे ताणा !"

जेवणं संपली. तिघेही पडवीत जाजमावर आडवे झाले. डोळ्यावर पंचाचा पिळा ठेवल्यावरोवर वावीशेटचा डोळा लागला. वाटुळकरमामा पडल्या पडल्या मुलीच्या स्थळांचा तोच तो विचार मनात घोळवू लागले. काका आढ्याकडे डोळे लावून नुसते लवंडले होते. त्यांच्या मनात पुन्हा पुन्हा विचार डोकावत होताः कोकणच्या वसाहतीचं व्रत घेतलेल्या परशुरामाला असल्याच अडचणीना तोंड द्यावं लागलं असेल? की त्याचं काम फार सोपं आणि सरळ होतं ?

पितळेच्या फुलपात्रातून सर्वांचा संध्याकाळचा चहा झाल्यावर वैकुंठवाबानी चुळबुळीला सुरुवात केली.

"आता पोचवा आमाला आमच्या झोपडीत."

"कां ? इथं गोड नाही वाटत ?"

"गोडीचा प्रस्नच नाय. असं परावलंवी माणूस आपून. कुठवर भार द्यावा दुसऱ्यावर ? आपल्या दारात आपुन आपले राजे !"

"आज रात्री इथंच वस्ती करायच्याय सगळ्यानी. उद्या कोंबडा आरवला की हलायचं." काकांनी निक्षून सांगितलं. त्यावर कुणी 'ब्र' काढला नाही.

अरिष्ट टळलं नि शिवाय वावीशेटच्या पडवीवर फुकटचात पिठलंभात वोकणायला मिळाला म्हणून सगळे खुषाल झाले. लेकुरवाळ्या वायानी पोराना न डाफरता पाजलं. वावीशेटने भलाई जोडल्यामुळे म्हाताऱ्याना हायसं वाटलं. सर्वांनी रात्री पत्रावळीत पडलेल्या कढीभातावर आडवा हात मारला.

उभा गाव तुळसकरांच्या आश्रयाला आला आणि वाडवडिलांच्या पुण्याईने आपण त्याना आश्रय तर दिलाच पण अभयही त्यांच्या ओटीत टाकलं, ह्याची वावीशेटना मनोमन धन्यता वाटली. झोपण्याच्या अगोदर देव्हाऱ्यातल्या नृसिंहाच्या तसबिरीसमोर हात जोडून ते म्हणाले, " देवा नरसोवा, तुझ्या आशीर्वादाने ह्या आमच्या वास्तूला यश लाभलं. आमच्या मुलावाळांच्या पिढ्यानासुद्धा ते असंच लाभू दे. देवा, तुझी सेवा आमच्या हातानी तू करून घे ! जय् नरसिंह !"

नंतर निजानीज झाली.

* *

## [ १३ ]

मध्यरात्री वारा जोराने वाहू लागला. तुळसकरांच्या आगरातल्या झाडामाडांच्या पानांची सळसळ लयवद्ध होऊ लागली. झुळकांचा आणि एकसुरी आवाजाचा संमिश्र परिणाम होऊन अंगणात पडलेली मंडळी गाढ झोपी गेली. वाहात्या वाऱ्यामुळे आकाशसुद्धा वाहू लागलं. भुरके, विरळ ढग दूर गेले. निळ्या आकाशात चंद्राची सोनेरी कोर चमकू लागली. तिच्या फिकट चांदण्यांचा सडा सर्वत्र पडला. चिंवावं गाव आणि पंचक्रोशी मंद चांदण्यात तरंगू लागली.

थोड्या वेळाने नामा गुरव तडकाफडकी जागा झाला. गोणत्यावरच उठून बसत वडवडला,

"काय पडलं अंगावर ?"

त्याचं वोलणं गाढ झोपी गेलेल्या कुणालाच ऐकू आलं नाही. कुणीही हालचाल केली नाही, तशी तो कष्टी झाला. वसल्या वसल्या त्याने झोपी गेलेल्या सर्वांचे चेहेरे वघितले. कुणाच्याही चेहेऱ्यावर कसलीही काळजी त्याला दिसली नाही. उलट काहीजणं तर झोपेतही तोंड उघडं टाकून हसत असल्यासारखेच दिसत होते. एकटं असं भुतासारखं वसून काय करणार ? नामा गुरवाने परत गोणत्याला पाठ लावली. डोळे मिटून झोपी जाण्याचा त्याने प्रयत्न केला. पण नीज येईना. तो तसाच पडून राहिला.

इतक्यात निंवाच्या खाली चिरगूट टाकून पडलेले वैकुंठवावा अर्धवट शुद्धीत, अर्धवट झोपेत म्हणाले,

"अरे ही काय उठवायची रीत काय रे ! धोंडे मारून कुणी उठवलाय काय आजवर ?"

कानी शब्द पडताच नामा खडवडून अंथरुणात वसला. म्हणाला,

"काय भानगड हाय वावा ?"

"भानगड काय असायची ? धोंडे मारून उठवू नका मला. दिसत नसलं तरी माणूसच हाय ना मी ?"

"तुम्हालासुद्धा लागला दगड ?"

"लागला म्हंजे ? चक्क छातीवरच वसला न काय !"

"मलासुद्धा लागला !"

इतकं संभाषण होऊनही—कुणी उठलं नाही, की जागं झालं नाही. नामाला मोठं नवल वाटलं. ही काय झोपायची रीत ? झोप कशी पाहीजे ? पाखरासारखी! फांदीवरलं पान हललं तरी गडी ताजातवाना होऊन वसला पाहिजे.

" वावा, काय तरी भानगड दिसत्याय."

'भानगड कसची, चावटपणा हाय सुद्ध!'

"मी करतो पाहारा. तुम्ही काढा एक झोप तोंवसर."

नामाचं वाक्य संपायला आणि गडग्याच्या पलीकडून एक दगड सूं सूं करीत यायला नि पडवीच्या मेढीला टांगून ठेवलेल्या काजळलेल्या कंदीलावर वसायला एकच गाठ पडली. काच खळकन् फुटली. दिवा गेला. काळोखात सगळ्याना जाग आली. फिकट चंद्रप्रकाशात सर्वजण श्वास रोखून एकमेकांकडे पाहू लागले. काय झालं, केव्हा झालं, कुणी केलं, कुणालाच काही कळेना. साऱ्यांच्या जिभा सुकल्या.

अनुक्रमणिका






"काका, उठा तरी." बाबीशेट गोंधळून म्हणाले.

"मी केव्हाचा जागा आहे."

"मग प्रकार काय आहे ?"

"दगड येताहेत."

"काय म्हणता !"

"पहिला गुरवाला बसला."

"मग जागं नाही का करायचंत."

"गुरवाला जाग आलीवती. पण मग लवंडला असावा."

"खरं म्हणजे त्याच वेळी ओरड घालायचीत तुम्ही."

"खरं म्हणजे मी तुम्हाला गेले चार दिवस जागं करतोय !"

"त्याचं नाही हो मी सांगत. आत्ता दगड यायला लागलेत त्याबद्दल बोलतोय मी."

"ओरड घालून काय व्हायचंय ? ते पन्नास तरी असावेत."

"पाहिलेत तुम्ही ?"

"पाहायलाच कशाला हवं ? पायरव ऐकलाय."

"कुठच्या दिशेनं ?"

"समोरून आले नि मावळतीकडे गेले."

"तुम्हाला भास झाला असेल."

"भास वरा होईल. चक्क काकानी ऐकलंय की."

"जशी नरसोबाची इच्छा !"

"आता हळूच आत जा नि दिवा लावा. तेवढाच धीर येईल सर्वांना."

सर्वजणांनी श्वास रोखून बाबीशेटना माजघरात चाचपडत जाताना पाहिलं. मंजि म्हणाला,

"आजोबा, तुम्हाला नाही उमगणार. मी,दुसरा कंदील लावून आणतो."

बाबीशेटना पटलं. ते माघारी फिरून अंथरूणातच देव्हाऱ्याच्या दिशेकडे पुढा करून बसले. मंजिनाथ कंदील लावून घेऊन पडवीवर आला. अंगणातले सर्वजण अंथरुण सोडून कंदीलाजवळ येऊन इवलाली तोंडं करून बसले.

"अरे, मला न्या की तिकडं." वैकुंठबाबा घाईला आले.

"आलो हं बाबा !" मंजिनाथ म्हणाला नि त्याना सावकाश घेऊन आला.

"बघा ह्या मुलाचं शहाणपण ! वाघ आहे हा वाघ !" बाबीशेट गहिवरून म्हणाले.

"पण अखेर हाही मुबैला जाईल ! नि ह्या भूमीला वाली कोणी उरणार नाही तो नाहीच !" काकानी सांगितलं.

सगळे जण स्तब्ध झाले. गडग्याच्या पलीकडे पायरव ऐकू आला—आणि पायरवामागोमाग चारपाच धटिंगण एकदम अंगणात घुसले. काकू, ताई, वाटुळकरमामी, साऱ्या सुन्न झाल्या.

सर्वांच्या अंगावर शहारे उठले. कोणाला शब्द फुटेना. मंजि पडवीवर गेला आणि कंदीलाची वात वाढवू लागला. इतक्यात एकजण ओरडला.

"वहां मत जाव !"

मंजि जागच्या जागी थबकला. मग ओरडणारा हातातला दंडा हापटीत पुढे येऊन म्हणाला,

"कब जायगा, तुम लोग यहांसे ?"

कुणीच उत्तर दिलं नाही.

"अभ्भी के अभ्भी निकालो यहांसे !"

"आम्ही काय म्हणतो ते तर ऐका—" काकानी अजिजीनं विनवलं.

"वो हम कुछ नही जानता. तुम अभ्भी के अभ्भी यहांसे निकालो."

"कुठं जायचं आम्ही रातीच्या पारी ?"

"जहान्नममे जाव !"

"निदान सकाळपर्यंत तरी थांबा."

"आप देखना चाहते ?" तो म्हणाला आणि त्याने तोंडात आडवी बोटं घालून खणखणीत शीळ घातली. त्यासरशी पाच पन्नास लाठ्या काठ्या घेतलेले मारेकरी गडग्याआडून येऊन तुळसकरांच्या आवारात हजर झाले.

"देखो, इतने लोग बम्बईसे आये है ! बोलो, लढना चाहीये ? अभी के अभी गाव खाली करो !"

ते हत्यारबंद गडी बघून सर्वांच्या दातखिळ्या बसल्या. काका आपल्या माणसाना उद्देशून म्हणाले,

"चला मंडळी, विषाची परीक्षा बघण्यात अर्थ नाही. आपण निघायचं."

"पण कुठं ?" वैकुंठबाबानी विचारलं.

"देव रस्ता दाखवील तिकडे."

"पुन्हा एकदा विचारून बघा सकाळपर्यंत थांबतात काय ते ?"

"एखादा मुडदा पडलेला बघायचा नाही नं ? मग मी म्हणतो तसं करा. निघा."

"जलदी करो ! हमको इधर शांतीमे रहेना है. तुम दादा लोग हमको नही चाहीये ये गावमे."

"मी गाडी जुंपून आणू आजोबा मंजिनाथाने विचारलं.

"काय करशील ते खरं !"

मारेकरी परसंब धुंडाळत राहिले.

मंजिनाथ गाडी जुंपायला गोठ्यात गेला. माणसांची जाग लागल्यामुळे गोठ्यात जनावरं कान ताठ करून अंग आक्रमून उभी राहिली होती.

"आपण परवा नवस केलाय चिवाईला त्याचं काय?" वाटुळकरमामानी विचारलं,

"आपण जिवंत राहिलो तरची ना गोष्ट ?"

"असं भलतंच बोलू नका बाई अभद्र."

"मग भलत्याच वेळी नवसाचं काय काढलंयस तू ?"

"चुकलं माझं—वस्स ?"

मंजिनाथने खटारा जुपून आणला.

"अगोदर वैकुंठबाबाना बसवा."

चार लोकानी उचलून वैकुंठबाबाना खटाऱ्यात बसवलं.

(पान ७२ वर पहा )



सुधीर

'दीपावली'च्या दर अंकातून निवडक हिंदी मराठी चित्रपटांची समीक्षणे देण्याचा उपक्रम आम्ही सुरू करीत असून या चित्रपटांचा दर्जा वाचकांना नेमका माहीत व्हावा, त्यांना मार्गदर्शन मिळावे म्हणून काही चिन्हांचा निर्देश परिक्षणाच्या आरंभी केला जाईल या चिन्हांचा अर्थ—

| | |
|---|---|
| ☆☆☆☆☆ | अविस्मरणीय निर्मिती |
| ☆☆☆☆ | प्रेक्षणीय, दर्जेदार निर्मिती |
| ☆☆☆ | बऱ्यापैकी निर्मिती |
| ☆☆ | सर्वसामान्य निर्मिती |
| ☆ | अतिसामान्य निर्मिती |

साधु और सैतान, तीसरी कसम, एक कली मुस्काई, वासना, आवरू, हमसाया आणि एकटी या अलीकडील नव्या चित्रपटात विनोदी, करमणूकप्रधान चित्र म्हणून साधु और सैतान, कलात्मक चित्र म्हणून तीसरी कसम आणि दिग्दर्शन, अभिनय कौशल्यामुळे दर्जेदार ठरणारे एकटी हे विशेष सोडले तर बाकी सारी सामान्य, ठरीव साच्याची वाटतात.

### **** करमणूकप्रधान 'साधू और सैतान'

भीमसिंग मेहमूद प्रॉडक्शन्सचे "साधू और सैतान" विषयाचे वेगळेपण, त्याची हताळणी यामुळे आकर्षक बनले आहे. एक भावडा परोपकारी टॅक्सिड्रायव्हर-बजरंग, सत्प्रवृत्त बँक कारकून—साधुराम, आणि पैशाच्या लोभाने वाटेल ते पाप करायला तयार होणारा डाकू दिलावर या तिघांची ही कथा ! साधुरामचा सच्चेपणा, प्रामाणिकपणा हाच त्याच्यावर कशी आफत आणतो हे या चित्रात मोठ्या विनोदी पद्धतीने दाखविले आहे. जाता जाता सच्चाईचा अतिरेक माणसाला कसा तापदायक ठरतो हे सांगण्याचे कामही चित्राने केले आहे, हीच गोष्ट विशेष महत्त्वाची ! विनोदाची सारी मदार बजरंगवर आहे. हे काम मेहमूदने करूनही त्यात कुठेही आचरटपणा, अतिरेकीपणा येऊ न देण्याची दक्षता घेतली आहे. बजरंगच्या व्यक्तिरेखेला काही अर्थ ठेवला आहे त्याचा निर्देश आवर्जून करावासा वाटतो. चित्राचे दिग्दर्शक ए. भीमसिंग हेच चित्राचे पटकथाकार त्यांनी आपल्या दोनही कामगिऱ्या मोठ्या प्रामाणिकपणाने पार पाडल्या आहेत. पटकथा एका निश्चित विषयावर लक्ष केंद्रित ठेऊन लिहिली आहे, तशीच दिग्दर्शित केली आहे. त्यामुळे नेहमीच्या फालतू गोष्टींना काटशह मिळाला आहे. कथेत तीन नायक, या तीनही नायकांची कामे ओमप्रकाश, मेहमूद आणि प्राण या तिघा कलाकारांनी सर्वस्व ओतून साकार केली आहेत. साधुरामच्या कामात ओमप्रकाश प्रेक्षकांची अपेक्षित सहानुभूती मिळवून जातो. हाच त्याचा विशेष ! मेहमूदने बजरंगच्या कामात राखलेला संयम कौतुकास्पद ! ! प्राण खलप्रवृत्ती भूमिका करण्यात पटाईत, त्याने दिलावर डाकू नेहमीच्याच सफाईने उभा केला आहे. मद्रदेशीय भारती ही चित्राची नायिका ! ती दिसली चांगली, एक नवा चेहरा पहायला मिळाल्याने बरे वाटले. किशोरकुमार दिलीपकुमार, सुनीलदत्त, अशोककुमार, निरूपा रॉय, मुमताज, या हिंदी चित्रातील प्रसिद्ध कलाकारांना छोटयाछोटया भूमिकातून उभे करून चित्राचे आकर्षण वाढविले आहे. हे कलाकार काही मिनिटेच पडद्यावर पाहून मौज वाटली. संगीत लक्ष्मीकान्त प्यारेलाल यांचं, त्यात खास उल्लेख करावा असे काहीही नाही. तांत्रिक दृष्टचाही चित्र आकर्षक आहे. एकूण बऱ्याच दिवसांनी एक बऱ्यापैकी विनोदी चित्र पाहिल्याचे समाधान "साधु और सैतान"मुळे मिळाले हा विशेष !

### ***** कलात्मक, स्मरणीय 'तीसरी कसम'

गतवर्षीचे राष्ट्रपती पदक विजेते चित्र 'तीसरी कसम'चा उल्लेख एक दर्जेदार, कलासंपन्न चित्र म्हणून करावा लागेल. खरोखर चित्रपट पारितोषिकाला शंभर टक्के योग्य आहे असा निर्वाळा द्यावासा वाटतो. याचे सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे कसलाही धांगडधिंगा, फालतूपणा अगर ग्लॅमर याच्या मागे लागून मूळ चांगल्या नाजूक विषयाचे मातेरे केलेलें नाही. विषय जितका नाजूक तितक्याच

'साधू और सैतान' मध्ये प्राण आणि ओमप्रकाश.



हळूवारपणाने तो मांडला आहे. यातही कलात्मकता कुठेही विघडणार नाही ही दक्षता घेतलेली, त्यामुळे चित्र स्मरणीय ठरते. हीरामण या एका भावडचा गाडीवानाच्या दोन प्रतिज्ञा असतात: एक म्हणजे गाडीतून चोरीचा माल न्यायचा नाही. दुसरी म्हणजे गाडीतून बांबू वासे न्यायचे नाहीत. याप्रमाणेच तो तिसरी प्रतिज्ञा करतो की गाडीतून तमाशात काम करणाऱ्या बाईला केव्हांही न्यायचे नाही. कां ? त्याला कारण तसेच घडते. हीराबाई नावाच्या एका सुस्वरूप तमासगीरबाईला तो गाडीतून नेत असता दोघांची दोस्ती जमते. ही पुढे इतकी वाढते की, लोकांत चर्चा होऊ लागते. हीरामण त्याच्या भावडचा स्वाभावानुसार, हीराबाईला तिच्या लाघवी प्रेमळ स्वभावामुळे प्रति देवता मानू लागतो. हीराबाईलाही हीरामण आवडत असतो. पण नाच-गाण्याची नशा तिला इतकी प्रचंड असते की ते सोडून हीरामणजवळ रहाण्याची तिची तयारी होत नाही. वरं, खरी परिस्थिती हीरामणला समजावून द्यावी तर त्याचे स्वप्न भंग पावेल ही भीती, अखेर हीराबाई नाइलाजाने हीरामणच्या आयुष्यातून कायमची दूर जाते. हीरामणला मात्र खरा प्रकार न कळाल्याने तो दुःखी होतो, नाराज होतो. आणि तिसरी शपथ घेतो. विषय फार मोठा आहे असे मुळीच नाही. तरीही सुबुद्ध, सुजाण प्रेक्षकांना अखेरपर्यंत खुर्चीला खिळवून ठेवण्याचे सामर्थ्य त्यामध्ये आहे हा विशेष ! ह्या श्रेयाचे वाटेकरी पटकथाकार नवेंदु घोष, दिग्दर्शक वासू भट्टाचार्य आणि राजकपूर, वहीदा हे कलाकारच प्रामुख्याने आहेत. हीरामण-हीराबाई या दोघातील छोटे छोटे प्रसंग नवेंदु घोष यांनी फारच बहारीने उभे केले आहेत, तितकेच दर्जेदारपणे ते दिग्दर्शित केले गेले आहेत. अनेक कलासंपन्न बंगाली चित्रांची आठवण व्हावी असे हे चित्र आहे येवढे म्हटल्याने दिग्दर्शकाची ताकद कळून येईल.

धांगडधिंगा, धावाधाव, पळापळ, वाफ्कळ कोट्या, विनोद यांना यात कसा तो थाराच नसल्याने सामान्य प्रेक्षकांना हे चित्र कदाचित आवडणारही नाही. काही ठिकाणी तसा अनुभवदेखील आला आहे. पण म्हणून बुद्धिवादी प्रेक्षकांनी त्याकड पाठ फिरविली तर चित्र निर्माते, कलाकार, दिग्दर्शक, तंत्रज्ञ साऱ्या जणांवर फार मोठा अन्याय होईल. अभिनयाच्या बाबतीत राजकपूर आणि वहीदा रेहमान या समर्थ कलाकारांवरच सारी मदार ! त्यांच्या अभिनयकौशल्याबद्दल नव्याने काय लिहावे? दोघांच्याही सुजाण, सफाईदार अभिनयाने चित्र स्मरणीय ठरले असूनही तुलनाच करायची, तर वहीदा रेहमान कांकणभर सरसच वाटते. अनेक मूक प्रसंगात तिच्या चेहऱ्यावरचे बदलते अचूक भाव वहाव्वाची दाद द्यावी असे होते. वहीदाच्या नृत्य कौशल्याचाही भरपूर उपयोग करून घेतला आहे. राजकपूरने आपले काम तन्मयतेने, जिद्दीने केले आहे. त्याच्या कामातील उत्साह कौतुकास्पद! एक गोष्ट खटकते ती म्हणजे बावळट, भावडचा आणि प्रथमपासूनच सहानुभूती वाटावी अशा भूमिका तो नेहमी कां पत्करतो ? जणू तो त्याचा साचाच बनला आहे. त्यापेक्षा काही वेगळे दाखवून आपले अभिनयकौशल्य त्याने दाखवून द्यावे असे सारखे वाटते. शंकर जयकिशन यांचे संगीत श्रवणीय. विशेष म्हणजे त्यांचे बॅकग्राऊंड म्युझिक फारच मनोरम आहे. सतारीच्या विविध गती अशा कौशल्याने सादर केल्या आहेत की प्रेक्षक मंत्रमुग्ध व्हावा. सुब्राता मिश्रा या छायाचित्रकाराची किमयाही मनमोहक आहे. हल्लीचा काळ संगीत चित्रांचा, असे असतांना हे चित्र ब्लॅक अँड व्हाईटमध्ये असूनही कुठेही खटकत नाही. खेड्यातील आणि जत्रेतील वातावरण मोठ्या अचूकपणे टिपण्यात छायाचित्रकाराची कमाल दिसून येते. सर्वार्थाने संपन्न असलेले ही 'तीसरी कसम' खऱ्या रसिकाच्या तरी दीर्घकाळ स्मरणात राहील अशी आहे.

**** 'वासना' उणे राजकुमार=शून्य**

गेल्या महिन्यात प्रसिद्ध झालेल्या चित्रात ज्याने फार मोठा अपेक्षाभंग केला ते चित्र म्हणजे 'वासना' ! या चित्राबद्दल अपेक्षा वाटाव्या याचे प्रमुख कारण म्हणजे याचे निर्माते कुलजीत पॉल परदेशातून चित्र निर्मितीचा खास अभ्यास करून आलेले! तेव्हा तिकडील चित्रांप्रमाणे ते काही नाविन्यपूर्ण, आदर्श ठरावी अशी कलाकृती सादर करतील ही अपेक्षा, पण नेमके हेच या चित्रात झालेले नाही. इतर अनेक गल्लाभरू चित्रांप्रमाणे यातही आचरट विनोदी व्यक्तिरेखा, त्यांचा तो उबग आणणारा विनोद, याच जोडीला कथेशी फारसा संबंधनसलेले तरुण नायकनायिकाही आहेत. त्यांची ती वागेतली धावाधाव, प्रेमगीते वगैरे सारा मालमसाला ठासून भरला आहे. हे सारे पाहून मनस्वी दुःख होते. कारण ? निर्मात्याबद्दलच्या अपेक्षा ! चित्राने निराशा केली असली तरी राजकुमारचा प्रभावी, दैदीप्यमान अभिनय ही जमेची फार मोठी बाजू ! तेवढ्यासाठी तरी चित्र जरूर पहावे. बाकी आनंदच ! एका दारूबाजाची कथा, व्यसनापायी ज्याचा संसार, इज्जत याची धूळधाण झाली आहे असा व्यसनासक्त माणूस नेमके त्यावरच लक्ष न ठेवता इतर भरताड केली आहे हा फार मोठा दोष ! चित्र शोकान्त असूनही प्रेक्षकांच्या मनावर त्याचा काडीचाही परिणाम होत नाही. दिग्दर्शक या नात्याने टी. प्रकाशराव यांनी बजावलेली कामगिरी शून्य ! अभिनयातही राजकुमार खेरीज कुणीही फारसे उल्लेखनीय नाही. पद्मिनीला गुण दाखवायला वाव नाही. कुमुद छुगानी, विश्वजीत त्यांच्याविषयी काय बोलणार? कल्याणजी आनंदजी यांच्या संगीतात विशेष काही नाही. नेहमीप्रमाणेच चालीची भट्टी लावली आहे. जी. एल. जाधव यांचे आलिशान सेटस्, आणि मदन सिन्हा यांचे खुबसूरत छायाचित्रण यामुळे डोळ्याला आनंद होतो पण मनाला समाधान ? त्या








बाबतीत प्रेक्षक अतृप्तच !! एक राजकुमार सोडला तर सारे शून्य आहे.

### * नीरस, कळाहीन आवरू

आपल्या मुलाला किंवा मुलीला नायक किंवा नायिका बनवायचेच या हट्टाने काढलेली अलिकडची दोन चित्रे म्हणजे एक 'आवरू' तर दुसरे 'एक कली मुस्काई.' यातले आवरु तर सर्वार्थाने नीरस, कंटाळवाणे, कळाहीन. मात्र एक कली पुष्कळच समाधानकारक वाटते. निर्माते रावल यांचा मुलगा दीपककुमार ! या चिरंजीवांबळ अभिनयगुण फारच बेताचे. बहुतेक वेळा बोलणे, चालणे, अभिनय बायकी थाटाचा, हा सर्वात वाईट भाग ! क्वचित बरा दिसतो इतकीच जमेची बाजू ! असे असूनही रावल यांना दुर्बुद्धी आठवली म्हणून की काय त्यांनी प्रेक्षकांचा अंत पाहिला आहे. चित्राची कहाणीही आकर्षक नाही, तरुण तरुणीचे प्रेम, अचानक परिस्थितीच्या भोवऱ्यात सापडून तरुणीचे दुसऱ्याशी लग्न होते. मग नायक एकटा! मग तडपन, धडकन वगैरे, मग नायिकेच्या नवऱ्याचा अचानक मृत्यू, या प्रकरणी नायकाला अग्निदिव्यातून जावे लागते आणि अखेरीस लग्न होऊनही कुमारी राहिलेल्या नायिकेशी त्याचा विवाह होतो. कथेच्या बाबतीत प्रेक्षक नाराज, दिग्दर्शनाच्या बाबतीत हीच रड ! रावल यांचे दिग्दर्शन अति सामान्य, अभिनयातही हीच अवस्था. दीपककुमारचे भवितव्य तर कठीण आहे. बिम्मी ही नायिका, ती म्हणजे नुसती नटवी बाहुली, अभिनय जणू तिला अपरिचितच ! शशिकला व्हँप रोलमध्ये दिसली पण वय वाढत असल्याने ओव्हरअॅक्शन्स करू लागल्याचे जाणवते. लीला नायडू, रेहमान यांच्याबद्दल न लिहिणेच बरे ! चित्रात समाधान देणाऱ्या दोन तीन गोष्टीत पहिली गोष्ट म्हणजे अशोककुमार, निरुपारॉय या जोडीचा सहजसुंदर, खेळकर, अभिनय ! दोघेही त्यांच्या वाटचाचे प्रसंग अशा दिमाखात उभे करतात की त्याचा विसर पडणे केवळ अशक्य ! छायाचित्रकार एम. एन. मलहोत्रा यांची कामगिरी हा दुसरा विशेष ! केवळ कॅमेराने एखादे दृष्य सजीव करण्याची त्यांची हातोटी विशेष आहे. नायक आयुष्यात प्रथमच दारु पितो तेव्हा समोरचे प्रत्येक दृष्य त्याला हालताना दिसते ही गोष्ट कॅमेराला आंदोलने देऊन त्यांनी कमालीच्या कौशल्याने उभी केली आहे. सोनीक ओमी या अलिकडे उदयास आलेल्या संगीतकारांचा उपक्रमही स्मरणीय. बस्स, आवरूत समाधान मिळत असेल ते फक्त या तीन गोष्टींनी !

### * * * 'एक कली मुस्काई' मराठी निर्मात्याचे हिंदी चित्र

हिंदी चित्रसृष्टीत जिद्दीने पाय रोवून उभ्या राहिलेल्या वसंत जोगळेकरांनी केवळ आपल्या मुलीला वाव द्यायचा म्हणून नायिका प्रधान कथा निवडण्याची खबरदारी घेतली असली; तरी कथेतील वेगळेपण खास अभिनंदनीय ! वडिलांच्या हट्टीपणामुळे, विचित्र समजुतीमुळे त्यांनी जिला लहानपणापासून दूर शिकायला ठेवले होत अशा मुलीने आपल्या चातुर्याने, निग्रहामुळे वडिलांचा अहंकार, गैरसमज कसा दूर केला हे कथा लेखिका आणि नायिकेची आई सुमति जोगळेकर यांनी या चित्रात मांडले आहे. विषय नामीं तर आहेच पण त्यातही त्यातला नाजूकपणा, मृदुता हळूवारपणाने टिपण्याची कमाल दिग्दर्शक वसंत जोगळेकर यांनी केली आहे. फक्त त्यांनी दुर्लक्ष केलं आहे त विनोदी प्रसंग टिपताना ! एरव्ही मेहमूदचे चाळे त्यांना कसे खपले ? मेहमूदच्या तोंडच्या अश्लील वाक्यांकडे लक्ष दिलेले दिसत नाही. का हे सारे जाणून बुजून ? तसे असेल तर फार वाईट ! मीराचे पडद्यावरचे दर्शन काही वेळा सुसह्य नसले तरी अभिनयात तिने प्रगती दाखविली आहे. तिचे हसणे, बोलणे, अन् रुसणे देखील कसे सहज वाटते! आपल्या वडिलांना ज्यूस घण्याचा आग्रह करण्याचा प्रसंग ती अशा रुबाबात उभा करते की विचारू नका ! अशोक कुमारसारख्या श्रेष्ठ कलाकाराच्या बरोबरीने तिचा अभिनय लक्षात राहातो हे तिचे वैशिष्टच ! अशोककुमार लाजवाब ! जोगळेकरांची घोडचूक म्हणजे जॉय मुखर्जी सारखा अभिनयाची जराही माहिती नसलेला कलाकार त्यांनी निवडला, त्याच्या जागी दुसरा कुणी अभिनय कुशल नट मिळला नसता का ? मधु आपटे, ललिता पवार, नाना पळशीकर या मराठी कलाकारांची कामगिरी चांगली आहे. बाळ जोगळेकरांचे छायाचित्रण अभिनंदनीय !! संगीतकार मदनमोहन नहमीप्रमाणेच नाविन्यपूर्ण कामगिरी करून गेले आहेत. शास्त्रीय संगीताची बैठक देऊन गीतांना चाली देण्याचा त्यांचा विशेष त्यांनी राखला आहे.

• • •

---

## अभिनंदन

स्टेट बँक ऑफ इंडियाचे १९६९ चे अभिनव व सुंदर कॅलेंडर नववर्षभेट म्हणून 'दीपावली' कार्यालयाकडे आलेले आहे. आपला श्रेष्ठ सांस्कृतिक ठेवा असे अभिमानाने म्हणावे, त्या 'भारत–नृत्ये' असा विषय असलेली ६ रंगीत छायाचित्रे देऊन, विविधतेतून भारतीय एकात्मता साधलेली आहे. मोठ्या साईजच्या कॅलेंडरबरोबर त्याचीच लहान प्रतिकृति ( टेबल कॅलेंडर ) प्रकाशित करण्याची कल्पना नाविन्यपूर्ण वाटली – अशा तऱ्हेचे उत्कृष्ट निर्मिती मूल्ये असलेली ही दिनदर्शिका प्रसिद्ध केल्याबद्दल स्टेट बँकेचे संपर्काधिकारी श्री. जी. आर. पोक्षे यांचे मनःपूर्वक अभिनंदन !

— संपादक



अनुक्रमणिका

## दीपावलीची सन्मानपुष्पे



### एक जिद्दी आणि संपन्न व्यक्तित्व
### शंकर बळवंत पळशीकर

एक संपन्न, प्रयोगशील, श्रद्धाळ, मानी, जिद्दी व्यक्तित्व ! त्या व्यक्तित्वाचे लौकिक नाव — शंकर बळवंत पळशीकर !

**स्थान**—जे. जे. स्कूल ऑफ आर्टचे डीन ! नवे अधिष्ठाते, पण स्थानामुळे काहीना 'महात्म्य' येते तर काही माणसांमुळे त्या त्या स्थानांना महात्म्य प्राप्त होते. पळशीकर हे दुसऱ्या जातीत बसतात. कारण हे स्थान त्यांच्या 'महात्मते'मुळेच त्याना मिळाले आहे. त्यांची कलेच्या क्षेत्रातली तपश्चर्या आणि आर्ट स्कूलच्या परिसरातली सेवा–प्रयोगशीलता नव्या नव्या कल्पना-प्रयोगांनी त्यांनी चित्रकलेला दिलेले लेणे ह्या अनेकांचा परिणाम व परिपाक म्हणून त्यांना हे पद मिळाले आहे. मोठपण लाभले की, माणसे लहानपणच्या वा साधकावस्थेतल्या संकट व संघर्षमय जीवनाची शोधाशोध करायला लागतात. मग म्युनिसिपालिटीचे ( खोटे ) दिवे जाळले जातात. पण पळशीकरांची कलेच्या क्षेत्रातली प्रारंभकालीन वाटचाल ही खरोखरच 'कष्ट हाल हे अमुचे भाई' अशाच जातीची आहे. पण खंती नाहीत. चिरचिर, तक्रार नाही. ज्या जखमा झेलल्या त्याचे व्रण दाखवीत प्रदर्शन करण्याची वृत्तीही नाही. त्यावद्दल जाण मात्र आहे. त्या काळातल्या सर्व सहाय्यकर्त्या माणसांबद्दल अपार कृतज्ञता आहे. बोलताना गहिवर येतो तो जाणवतो किंवहुना माझ्या ह्या वाटचालीत त्या मित्रांच्या मुळेच मला हे यश मिळाले असे म्हणण्याचे मोठेपण मला जाणवले— बेंद्रे यांना ते " आर्ट स्कूलमध्ये मला जायचं आहे" म्हणाले. "तुला तिथे काय मिळणार आहे ?" असें वेंद्रे म्हणाले. पण पळशीकरांनी आर्ट स्कूलमध्ये जे पेरले आणि मिळविले ते पाहिल्यानंतर आपले म्हणणे खोटे ठरले हे मान्य करण्याचा मोठेपणा बेंद्रे यांच्या जवळ कसा होता हे सांगताना पळशीकर गहिवरले.

घराण्यात चित्रकलेचा वारसा नाही. मातुल घराण्यातही तो नाही. आणि त्यांनी साधना केली ती मात्र चित्रकलेची ! ड्रॉइंग विषय घेऊन ते मॅट्रिक झाले. पण खोल कुठेतरी जर्म असलाच पाहिजे ह्याचा एक किस्सा सांगताना एका जत्रेच्या वेळी त्यांनी ( वयाच्या दहाव्या वर्षी ) मोर काढला होता आणि त्याला तीन रुपयांचे बक्षीस मिळाले होते आणि ते आपल्या वडिलांनी भांडून कसे मिळविले होते ह्याचा रंजक इतिहासच पेश केला. ते जणु पुन्हा लहान झाले. एकीकडे ते बोलत होते आणि एकीकडे समोरच्या पुस्तकाच्या वेष्ठनावर लहानपणचा मोर आकार घेत होता. त्या मोराची, त्या तीन रुपयांची आणि वडिलांची स्मृति जणु साकारत होती. वडिलांची स्मृति हे तर त्यांचे मोठे प्रेरणास्थान आहे. वडील वारले तेव्हा पळशीकर ११ वर्षांचे होते. पण मृत्यूपूर्वी ते आईजवळ एक वाक्य बोलले होते "हा मुलगा चांगले नाव काढील" हे वाक्य सतत माझ्या कानात घुमत असते. ती तर माझी प्रेरणा आहे. त्यातून तर जिद्द फुलली." पळशीकर मानी आहेत. स्पष्टवक्ते आहेत. कलेचा बाजार केलेला त्यांना आवडत नाही. लौकिक यशापयशाची गणिते मांडून जे चितारले जाते ते कलात्मकच असते असा दावा त्याना मान्य नाही. आणि'लौकिक यशा'लाही प्रसंगी खडसावण्याचे धैर्य त्यांच्याजवळ आहे. त्याला ते "चॉकोलेट बॉक्स चित्रे म्हणतात. कलेच्या क्षेत्रातही 'पावित्र्य' असलेच पाहिजे ही श्रद्धा ते बाळगतात. 'मॉडर्न आर्ट मला समजत नाही' म्हणणाऱ्याला ते हसत हसत विचारतील. " तू कोण आहेस, काय आहेस हे तरी तुला समजतं का ?" हा सारा प्रवास तो 'मी' जाणून घेण्याच्याच दिशेने चालला आहे. सध्या ते शब्दांच्या मागे दडलेले जे रंग असतात, ते चित्रांकित करीत आहेत. 'न्यूडस्' चा अभ्यास, चित्रांकन हे कलाकाराच्या वैयक्तिक प्रगतीच्या मार्गातला एक टप्पा असू शकेल–असतो. पण ह्याचेच जेव्हा प्रदर्शन होऊ लागते तेव्हा कुठेतरी अकलात्मक विचाराला प्राधान्य दिले जाते असे त्यांना वाटत राहते. त्यांनी आपल्या कुठल्याही प्रदर्शनात त्यामुळेच 'न्यूडस्'चे प्रदर्शन मांडले नाही. ही जाण चिंतनशीलतेतून जशी आली तशीच तत्वज्ञान, अध्यात्मपर ग्रंथांच्या वाचनातून गिताजंलि, बायबल, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, पातंजल योगादि पुस्तकांचे वाचन त्यांच्या

( पृष्ठ ७२ वर )










ज्ञानेश्वर नाडकर्णी

## एक अभिनव चर्चासत्र

महालक्ष्मीकडे जाताना पेडर रोडच्या उतरणीला जेथे सुरुवात होते तेथेच डाव्या हाताला फिल्म्स डिव्हिजनचे आवार आहे. गेल्या वर्षात महिन्या-दोन महिन्यातून फिल्म्स डिव्हिजनमध्ये नेहमी फेरी होत असे. याच आवारात एक छोटेसे वातानुकूल चित्रपटगृह आहे. त्यात फिल्म्स डिव्हिजनने निर्माण केलेले छोटेमोठे अनुबोधपट महिन्यातून एखादे दिवशी दाखविले जात, आणि त्यांच्यावर उपस्थितांची चर्चा होत असे. हा उपक्रम सुरू झाला तेव्हा श्री. एस्. एन्. लिमये हे फिल्म्स डिव्हिजनचे प्रमुख अधिकारी होते, आणि अध्यक्षस्थानावरून ते नेहमी काटेकोरपणे या चर्चांचे नियंत्रण करीत.

उपस्थितांमध्ये फिल्म्स डिव्हिजनमधील तरुण चित्रपटनिर्माते, स्वतंत्रपणे अनुबोधपट निर्माण करणारे काही निर्माते, काही चित्रपटसमीक्षक आणि काही अन्य कलाक्षेत्रातले विचारवंत असत. अनुबोधपट दाखवून झाला की लगेच त्याच्यावर चर्चा, अशी प्रथा. हे चर्चासत्र बहुधा सबंध दिवसभर आणि अधूनमधून दीड दिवस चाले. जास्त दीर्घकाल चालणाऱ्या चर्चासत्राला दिल्ली, मद्रास, कलकत्ता इ. केंद्रांतील निमंत्रितही उपस्थित असत.

मला आठवतात त्या चर्चा बऱ्याच हमरीतुमरीच्या झाल्या. प्रताप शर्मा या तरुण निर्मात्याचा पहिलावहिला अनुबोधपट 'दुष्काळाची चौकट' या विहारच्या दुष्काळी परिस्थितीचे हृदयविदारक चित्रण करणारा होता. ज्यांचे ' अ टच ऑफ ब्राइटनेस ' हे इंग्रजी नाटक महाराष्ट्र सरकारने बंदी घातल्यामुळे काही वर्षांपूर्वी लंडनच्या राष्ट्रकुल महोत्सवापर्यंत पोचू शकले नाही ते हे शर्मा. त्यां नाटकात मुंबईतील वेश्या-वस्तीचे चित्रण होते; त्यामुळे आपल्या भारतीय संस्कृतीचे 'हे' दर्शन परदेशी घडवावे काय हा एक वादग्रस्त मुद्दा होऊन बसला होता. तशाच स्वरूपाचे काहीसे मुद्दे " दुष्काळाची चौकट " या अनुबोधपटावर टीका करणाऱ्यांनी मांडले होते.

सरकारसाठी हा अनुबोधपट तयार केला गेला होता; परंतु प्रत्यक्षातील सत्यदर्शनाचे भीषण स्वरूप पाहिल्यावर तो भारतीय प्रेक्षकांना दाखविणे इष्ट आहे की काय असा प्रश्न सरकारला पडला. गंमत अशी की युरोपात हाच अनुबोधपट टेलिव्हिजनवर दाखवून विहार दुष्काळग्रस्तांसाठी मदत गोळा करण्यात आलेली होती ! अनुबोधपट तयार झाला तेव्हा दुष्काळाचा पहिला तडाखा ओसरला होता. तुरळक कोठेकोठे पुनर्वसनाचे प्रयत्न सुरू झालेले आहेत हे या अनुबोधपटाच्या शेवटी एक ताजा कलम जोडून मुद्दाम दाखविण्यात आलेले होते. ( अन् सरकारी प्रेरणेमुळे जोडलेला हाच भाग तेवढा अनुबोधपटाच्या कलात्मक एकसंधतेला बाध आणणारा ठरत होता.)

तांत्रिक दृष्टया हा अनुबोधपट पहिल्या दर्जाचा होता. मंत्र्यांपासून तो सामान्य भुकेकंगालांपर्यंत अनेकांच्या छोटयाछोटया मुलाखती त्यात घेतलेल्या होत्या. या बिहारी नागरिकांच्या शब्दांनी तेथील जनतेच्या दुःखाला वाचा फोडली होती, आणि पडद्यावर या जनतेची अन्नान्नदशा अतिशय भेसूर स्वरूपात प्रत्यक्ष दिसतही होती. चर्चेला जमलेले बहुतेक प्रेक्षक भारून गेलेले दिसले; परंतु अनुबोधपटाचे नाव लक्षात घेता त्यात दुष्काळाच्या पार्श्वभूमीची पुरेशी माहिती दिलेली नाही अशी तक्रार सुप्रसिद्ध पत्रकार व चित्रपट-दिग्दर्शक के. अहमद अब्बास यांनी केली.

या चर्चेत डोळयात भरले ते व्यक्तिमत्व केंद्रीय माहिती आणि नभोवाणी खात्याचे सचीव श्री. अशोक मित्र यांचे. शब्दोच्चारांवरून विलायती शिक्षण स्पष्ट दिसावे. भाषणात आणि संभाषणात सहज प्रत्ययाला येणारी विद्वत्ता कोरडी नव्हती. दिसायला एखाद्या प्रौढ प्राध्यापकासारखा असलेला हा सरकारी अधिकारी समानशीलांमध्ये मिसळताना शिष्टपणाचे कोणतेच पवित्रे घेत नव्हता. ' दुष्काळाची चौकट ' या अनुबोधपटासंबंधाने सरकारची भूमिका काय आहे हे स्पष्ट करणे म्हणजे एक तारेवरची कसरत होती. परंतु याच चर्चेच्या वेळी श्री. मित्रांनी जाहीर केले की हा अनुबोधपट भारतात सर्वत्र दाखविला जाईल.

पुष्कळ वेळा एखाद्या अनुबोधपटाच्या तंत्राची अगर त्याच्या गुणदोषांची चर्चा होण्याऐवजी या सत्रांमध्ये सरकारी यंत्रणेच्या जाचकपणाविषयीच फार तावातावाने बोलले जाई. संततिनियमनाविषयी एक अनुबोधपट आरोग्य खात्यासाठीच तयार करण्यात आलेला होता. यात 'लूप' संबंधाने अनेक स्त्री-नागरिकांच्या मुलाखती घेण्यात आलेल्या होत्या. 'लूप' विरोधीसुद्धा एखाद-दुसरे मत नोंदविण्यात आले होते. परंतु हा अनुबोधपट सार्वजनिक रीत्या दाखविण्यात येऊ नये; खास परवानगीने छोटयाछोटया मंडळांना तो दाखविण्यात यावा अशा प्रकारची, प्रत्यक्षात किचकट बंधने त्यावर घालण्यात आली होती ! या निमित्ताने एकंदर सेन्सॉरशिपच्या प्रश्नावर चर्चा करताकरता वेळ गेला.सरकारी प्रवक्त्याशी विचारविनिमय करण्यासाठी एक समिति नेमण्यात आली. (पुढे याचे निष्पन्न काय झाले हे माहीत नाही; परंतु सध्याचे माहिती आणि नभोवाणी मंत्री श्री. के. के. शहा हे फारच कर्मठ आहेत असे मला एका विख्यात अनुबोधपटनिर्मात्याने सांगितले.)

प्रत्येक चर्चेत एखाद्या कम्युनिस्ट पुढाऱ्याच्या आवेशात वाद घालणारी, आणि आपल्या स्फोटक शब्दांनी वादंग माजविणारी, व्यक्ती म्हणजे अनुबोधपटनिर्माते एस्. सुखदेव हे होत. यांचा 'इंडिया' ६७' हा एक-दीड तासाचा रंगीत अनुबोधपट त्यांच्या अंगच्या अभिजात कलागुणांची साक्ष द्यायला पुरेसा आहे. 'लाइफ' या अमेरिकन पाक्षिकात प्रसिद्ध होणाऱ्या रंगीत छायाचित्रांमध्ये








मानवी हालचालींचे मजेदार नमुने जसे टिपलेले असतात तसे, त्याच प्रकारच्या मनोहर रंगात, सुखदेव यानी भारतीय भूमीवर टिपलेले आहेत. त्यांच्या या चित्रपटावरसुद्धा फिल्म डिव्हिजनमध्ये चर्चा झाली. आजच्या भारताचे त्यात घडणारे दर्शन काहीसे एकांगी वाटणे साहजिक आहे ( उदा० माझ्या मते त्यात आपल्या देव-भोळेपणाची वाजवीपेक्षा जास्त टिंगल आहे ! ); परंतु सुखदेव यानी आपल्याला, वृत्तपत्रातून सहसा प्रकट न होणाऱ्या अशा या देशाच्या कोनाकोपऱ्यातल्या दैनंदिन जीवनाचे, निसर्गसौंदर्याचे, वास्तूंचे आणि अर्थातच् वेगवेगळ्या थरांतील माणसांचे अन् समूहाचे जिवंत दर्शन घडविलेले आहे. या चित्रपटाला निवेदन जोडलेले नाही; सुखदेव यांचा कॅमेराच अतिशय बोलका आहे. (मात्र त्यांनी अलीकडेच तयार केलेल्या, जवाहरलाल नेहरू यांच्या तीन मूर्ती मार्गावरील निवासस्थानातील वस्तुसंग्रहालयाबाबतच्या, अनुबोधपटात " इंडिया '६७" च्या चित्रणशैलीची धुंदी तुम्हाला दिसणार नाही! )

एकदा लाला लजपतराय यांच्या संबंधी फिल्म्स डिव्हिजनच्या बाहेरच्या एका निर्मात्याने तयार केलेल्या अनुबोधपटावर चर्चा करताना सुखदेव त्यातल्या राजकारणावरच घसरले. आर्यसमाजापाठी काही जातीय प्रेरणा असल्याचे त्यानी सुचविले. सुटाबुटातला पंजाबी निर्माता एकदम तापला, आणि सुखदेव यांच्याविषयी रागारागाने बोलून तो जवळजवळ चर्चेचे अध्यक्षपद आपल्या हाती घ्यायच्या मार्गाला लागला ! गेल्या वर्षांत या चर्चासत्रांमध्ये झालेला ' मारामारी'चा हा एकच प्रकार. अर्थात् एरवी सुखदेव यांची बोलण्याची पद्धतच इतकी जहाल असते— त्यात पुष्कळदा आक्रस्ताळेपणा असतो — की असा काही प्रकार होणार असे इतरांना सारखे वाटत असते !

थोडी वायफळ वडबड, काही संशयास्पद प्रशस्ती आणि निष्फळ वादंग सोडले तर या चर्चासत्रांनी आमच्या कला जीवनात बहार आणली आहे यात शंका नाही. फिल्म्स डिव्हिजनमधील ज्या निर्मात्याच्या अनुबोधपटावर चर्चा चालू असते त्याला अधूनमधून आपल्यावर झालेली टीका ऐकताना फारसा आनंद होत असेल असे मला वाटत नाही. या निर्मात्यांमध्ये भिन्न-भिन्न विचारप्रवाह प्रचलित आहेत; त्यांचे प्रतिबिंब स्वच्छपणे त्यांच्या कैफियतीत पडलेले असते. गेल्या वर्षाच्या सुरुवातीला काही तरुण निर्मात्यांनी आपल्या पहिल्यावहिल्या प्रयत्नातच भारतीय राजकारणाविषयी, या देशांतील तरुण पिढीविषयी आणि आपल्या आर्थिक परिस्थितीविषयी एक प्रांजळ दृष्टिकोन व्यक्त केला. सरकारी यंत्रणेत त्यांना हा दृष्टिकोण व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य मिळाले, त्याचप्रमाणे एखाद-दुसऱ्या निर्मात्याला तंत्राचे अत्याधुनिक प्रयोग करता आले, याचे श्रेय मध्यंतरी फिल्म्स डिव्हिजनचे सल्लागार म्हणून पॅरिसहून आलेले या संस्थेचे भूतपूर्व प्रमुख जहांगीर भौनागरी यांच्याकडे जाते. फिल्म्स डिव्हिजनचे सध्याचे प्रमुख श्री. खांडपूर यांचे सौजन्य आणि आर्जव चर्चासत्रांत प्रत्ययाला येत असतात. त्यांच्या कारकीर्दीत गेल्या वर्षीपेक्षा जास्त प्रभावी असे अनुबोधपट निर्माण होतात की नाही ते पाहायचे.





अनुक्रमणिका

# इब्सेनचे नाटक

इब्सेनविषयी प्रचलित समजूत अशी दिसते की गेल्या शतकात होऊन गेलेल्या या नॉर्वेजियन नाटककाराने केवळ सामाजिक समस्यांचा ऊहापोह करणारी 'डॉल्स हाऊस' (घरकुल)सारखी चर्चाप्रधान नाटके लिहिली. अशी त्याची खरोखरी तीन चारच नाटके आहेत. पण त्याचबरोबर 'द वाइल्ड डक'सारखे काव्यात्म स्वभावदर्शन घडविणारे, 'ब्रांद'-सारखे गूढगुंजनात्मक आणि 'हेडा गॅब्लर'सारखे भीषण शोकात्म नाटकही त्याने लिहिले. अलीकडेच थिएटर ग्रुपने सादर केलेले 'द वाइल्ड डक' पाहताना अनेक वर्षांपूर्वी पाहिलेल्या अल्काझींच्या वादग्रस्त 'हेडा गॅब्लर' ची तर आठवण झालीच, पण इब्सेनच्या नाटकाचे वातावरण, त्यातील व्यक्तिचित्रण आणि त्यातील भाव संबंधांचा जगावेगळा हळुवारपणा हा चेकॉव्हच्या नाटकांना किती जवळचा आहे याची आश्चर्यजनक प्रचीती आली. थिएटर ग्रूपने यापूर्वी चेकॉव्हची 'अंकल व्हान्या' आणि 'थ्री सिस्टर्स' ही नाटके रंगमंचावर आणलेली होती. त्यांचे दिग्दर्शन ज्यांनी केले त्या निशा दा कुन्हा यानीच 'द वाइल्ड डक'चे दिग्दर्शन केलेले होते हा एक उल्लेखनीय योगायोग.

जाल्मार नावाच्या एका मध्यमवर्गीय छायाचित्रकाराची ही कथा आहे. त्याचा म्हातारा बाप ज्या श्रीमंत जमीनदाराच्या पदरी असतो त्याच्याच आजारी बायकोची शुश्रूषा करण्यासाठी एके काळी जाल्मारची बायको नोकरीला राहिलेली होती. जाल्मारला तेरा-चौदा वर्षांची एकुलती एक मुलगी असते. नाटकात जे तंग वातावरण निर्माण होते त्याचे कारण दृष्टीने अधू असणारी ही आपली मुलगी आपल्या बायकोला त्या जमीनदारापासून झालेली आहे असा जाल्मारला संशय येऊ लागतो.

इब्सेनने सुरुवातीपासूनच आपल्याला या नाटकात गेल्या शतकातील युरोपियन समाजातील भिन्न थरांमधील दुराव्याची कल्पना दिलेली आहे. चेकॉव्हप्रमाणे त्याच्या नाटकांतील पात्रेसुद्धा आपली आर्थिक श्रेणी आणि त्यामुळे आपल्या व्यक्तिमत्त्वाला पडलेल्या मर्यादा स्पष्ट करीत असतात. त्या श्रीमंत जमीनदाराच्या घरी एक मेजवानी चाललेली असते. जमीनदाराचा मुलगा हा जाल्मारच्याच वयाचा; त्याचा मित्र. या मेजवानीला आलेले इतर लोक मात्र उच्च श्रेणीचे असतात, आणि जाल्मार ओशाळल्या-गत वावरत असतो. जमीनदाराच्या नोकरीत असलेला त्याचा म्हातारा बाप चुकून मेजवानीच्या खोलीत प्रवेश करतो तेव्हा जाल्मार तोंड लपवितो! हा पहिलाच प्रवेश आपल्या मनाला चटका लावून जातो.

जमीनदाराच्या मुलाला आपल्या बापाची विधुरावस्थेतील वागणूक पसंत नसते. तो जाल्मारच्या घरी भाडेकरू म्हणून राहा-यला येतो. जाल्मारच्या डोक्यात त्याच्या बायकोविषयी—विशे-षतः त्याच्या मुलीच्या जन्मपरंपरेविषयी—संशयाग्नी धुमसू लागतो तो या त्याच्या मित्राने त्याचे कान फुंकल्यामुळे. परंतु इब्सेनने येथे सांकेतिक खलनायक निर्माण केलेला नाही. डोस्टोएवस्कीच्या 'क्राइम अँड पनिशमेंट' या कादंबरीचा तरुण नायक एका विशिष्ट तत्वज्ञानाचा पडताळा घेण्यासाठी एका म्हातारीचा खून करतो. जाल्मारचा हा मित्रसुद्धा अशाच काही तात्विक शोधात असतो, आणि आपल्याला तो कितीही दुष्ट वाटला तरी त्याची इच्छा एव-ढीच असते की, एकदा सत्य उजेडात आले की जाल्मार आणि त्याची मुलगी यांच्यात काहीही अंतराय राहू नये.

जाल्मारची बायको ही एक साधीसुधी, गरिबीत संसार चाल-विणारी गृहिणी असते. इब्सेनची प्रतिभा आपल्याला थक्क करून टाकते ती जाल्मार व त्याची भावडी, स्वप्नाळू मुलगी या दोन पात्रांच्या अत्याधुनिक मनोविश्लेषणात्मक स्वभावचित्रणामुळे. जाल्मारला असा भ्रम असतो की आपण कसला तरी शास्त्रीय शोध लावणार आहोत. चरितार्थाच्या धकाधकीतून आपल्याला थोडीशी फुरसत मिळायला हवी. वस्तुतः जाल्मारची अशी कुवत नसते; परंतु त्याचा मित्र या बाबतीत त्याचा भ्रमनिरास कधी करीत नाही.

नाटकाच्या अखेरीला बापाने दूर लोटल्यामुळे व्यथित झालेली ती अधू नजरेची मुलगी आत्महत्या करते. इमारतीच्या वरच्या मजल्यावर असलेल्या जाल्मारच्या बिऱ्हाडाच्या एका बाजूच्या खोलीत त्याच्या बापाने काही पक्षी पाळलेले असतात. एके काळी शिकारी असलेला हा बाप त्या खोलीत उगाच खुडबुड करीत, बंदूक घेऊन दूरवरचे पक्षी टिपल्याची उगाच बतावणी करीत असतो. नाटकाचे नाव ज्यावरून घेतलेले आहे ते रानटी बदक याच खोलीत आपल्या लाडक्या मुलीसाठी म्हणून जाल्मारने पाळलेले असते. तिच्या निरागसपणाचे आणि भरारी घेऊ पाहणाऱ्या परंतु परिस्थितीने बंदिस्त करून ठेवलेल्या त्याच्या प्रतिभेचे ते एक प्रतीक आहे.

'द वाइल्ड डक' च्या कथानकाची मांडणी मूलतःच इब्सेनने अतिशय नाट्यपूर्ण पद्धतीने केलेली आहे. परंतु हे नाटक श्रेष्ठ ठरते ते त्यात लावलेल्या गूढतेच्या, तत्त्वचिंतनाच्या सुरामुळे. जाल्मार, त्याची मुलगी आणि त्याचा मित्र यांचे जडदेह तरी तत्कालीन सामा-जिक चौकटींत वावरत असले तरी त्यांच्या तोंडचे संवाद निखळ वास्तववादी नाहीत. रूढ वास्तवापलीकडचे मानवी अंतरंगाचे दर्शन इब्सेनने त्यांच्या द्वारे घडविलेले आहे. त्यामुळे एका अभि-जात कलाकृतीचा ठसा हे नाटक पाहताना आपल्या मनावर उमटत असतो.

जाल्मारची भूमिका दिग्दर्शिकेचे यजमान सिल्व्हेस्टर दा कुन्हा यानी केली. यापूर्वी त्यानी विनोदी भूमिकांमध्ये विशेष सफाई दाखविली होती; परंतु जाल्मारच्या मध्यमवर्गीय भित्रेपणाची हास्यास्पद अंगे आपल्या अभिनयाद्वारे व्यक्त करताना त्याच्याबद्दल प्रेक्षकाला वाटणारी सहानुभूती त्यानी कमी होऊ दिली नाही. जाल्मा-रच्या दुर्दैवी मुलीची भूमिका सबीरा मर्चंट यानी तन्मयतेने केली. लहान वयाचे सोंग त्यानी हुबेहूब आणलेले होते, आणि त्यांचे बोलणे-चालणे त्या भूमिकेच्या भावडेपणाला शोभण्यासारखे होते. जाल्म-रच्या मित्राच्या भूमिकेत कर्सी कात्रक यानी आपली नेहमीची ऐट आणि जरब दाखविली. त्यांच्या पत्नी उषा कात्रक यानी जाल्मारच्या पत्नीचे काम केले होते.

अत्यंत वास्तववादी नेपथ्य, वेषभूषा आणि प्रकाशयोजना हे गुण थिएटर ग्रूपच्या प्रयोगात नेहमीच दिसतात; तसे ते येथेही दिसले. इब्सेनविषयी पुन्हा विचार करण्यास मनाला प्रवृत्त करणारा असाच हा प्रयोग ठरला. ● ● ●








# मडगावच्या 'गोमंत विद्या निकेतन'चा सुवर्ण महोत्सव

( आमच्या विशेष प्रतिनिधीकडून )

मडगाव हे गोव्यातले एक टुमदार गाव. १९६४ साली जेव्हा येथे कवि कुसुमाग्रजांच्या अध्यक्षतेखाली मराठी साहित्य संमेलन भरले तेव्हा त्या अभूतपूर्व सोहळ्यासाठी अवघा गोमंतक सज्ज झाला होता. गेल्या चार वर्षांत मडगावात या संमेलनाच्या आठवणी अनेकदा निघाल्या असतील. स्थानिक कार्यकर्त्यांनी, नव्या-जुन्या पिढीतल्या सर्व वाङमयप्रेमी गोमंतकीयांनी, हजारो प्रतिनिधींची उपस्थिती लाभलेले ते संमेलन यशस्वी व्हावे म्हणून जिवाचे रान केले होते.

गेल्या डिसेंबरात मडगावच्या सांस्कृतिक इतिहासात उल्लेखनीय ठरणारा आणखी एक सोहळा असाच अविस्मरणीय रीतीने या गावात साजरा झाला. मडगावच्या लंवकोनी नगर व उद्यानाच्या एका बाजूला एक टोलेजंग इमारत नव्यानेच उभी राहिलेली तुम्हाला दिसेल. सुमारे ५६ वर्षांपूर्वी 'सारस्वत ब्राम्हण समाज' या नांवाने स्थापन झालेल्या आणि आता 'गोमंत विद्या निकेतन' या नांवाने परिचीत असलेल्या संस्थेची ही इमारत. मुख्य इमारतीच्या आत ९०० प्रेक्षक ज्यात वसू शकतील असे एक सुसज्ज, दुमजली नाटचगृहही आहे. याच नाटचगृहात ता.१३ ते १६ डिसेंवरच्या दरम्यान संस्थेच्या सुवर्णमहोत्सवाचा आणि इमारतीच्या उद्घाटनाचा समारंभ साजरा झाला.

पहिल्या दिवशी, म्हणजे १३ तारखेला, संध्याकाळी ब्रम्हवृन्दांच्या वेदपठणाने या कार्यक्रमाला सुरुवात झाली. समारंभाचे अध्यक्ष म्हणून भारताचे भूतपूर्व अर्थमंत्री आणि महाराष्ट्राचे एक दूरस्य, विचारवंत नेते डॉ. चिंतामणराव देशमुख हे आलेले होते. या निमित्ताने दोन तीन दिवस मडगावकराना त्यांचा व त्यांच्या पत्नी सौ. दुर्गावाई यांच्या सहवासाचा लाभ झाला. " मी स्वतः कोकणातला, त्यामुळे एका कोकणी माणसाला वाटणारे कुतूहल घेऊनच मी गोव्यात फिरलो" असे उद्गार डॉ० देशमुखानी आपल्या पहिल्या दिवशीच्या अध्यक्षीय भाषणातच, आपल्या मुक्कामाचे वर्णन करताना, काढले.

वेदपठणानंतर कविवर्य दा. अ. कारे यानी रचलेल्या गोमंतगीताचे समूहगायन झाले. पाच षोडशींनी म्हटलेल्या या गीताचा सर्वात कौतुकास्पद भाग म्हणजे त्यात ऐटवाजपणे तवल्याची साथ करणारा सुशांत केशव नायक हा देखण्या चेहऱ्याचा मुलगा अवघा सात वर्षांचा होता! यानंतर झालेल्या नांदीत श्रीपादराव नेवरेकर, कृष्णराव चोणकर, रामदास कामत व भारती वर्मा या कलावंतांनी भाग घेतला. त्यांच्या भूमिका असलेल्या कै. गोपालकृष्ण भोवेलिखित 'धन्य ते गायनी कळा' या नाटकाचा त्या आठवडचात गोव्यात दौरा तर होताच, परंतु दुसऱ्याच दिवशी त्याच रंगमंचावर प्रयोगही होता.

यानंतर गोव्याच्या ग्रामीण कलेचे दोन नमुने सादर करण्यात आले. स्वारी–वादनाच्या तालवद्धतेने श्रोत्यांचे लक्ष वेधून घेतले, तर कोसंत्रे यांच्या पारंपरिक संचाने आपल्या मंगलाचरण व गणराज–सरस्वतीपूजन या कार्यक्रमात दशावतारी पूर्वपीठिकेची एक झलक दाखविली. या सुरुवातीच्या कार्यक्रमाचे घावते निवेदन सूत्रधाराच्या वेषातील भिकू पै आंगले यानी केले.

यानंतर उद्घाटनाच्या मुख्य कार्यक्रमाला सुरुवात झाली. उपस्थितांचे स्वागत करणारे श्री. केशव अनंत नायक हे संस्थेच्या आद्य संस्थापकांपैकी एक. संस्थेच्या आजवरच्या कार्याचा त्यानी थोडक्यात आढावाही घेतला. सुवर्णमहोत्सवाचे उद्घाटन गोव्याच्या विधानसभेचे सभापती श्री. गोपाळ आप्पा कामत यांच्या हस्ते झाले. सुरुवातीला संस्थेचे नाव जातिवाचक असणे हे परिस्थितीप्राप्त होते; परंतु पोर्तुगिजांच्या राजवटीत तिने हाती घेतलेल्या ज्ञानदानाच्या कार्याला जातीयबंधने नव्हती हे श्री. कामत यानी आपल्या भाषणात स्पष्ट केले." आता काळ आणखी पुढे सरकला आहे तेव्हा संस्था केवळ हिंदूंचीच न राहता गोमंतकातील सर्व समाजाची वनावी" अशी अपेक्षा त्यानी याच ऐतिहासिक स्थित्यंतराच्या संदर्भात व्यक्त केली.

सभागृहाच्या औपचारिक उद्घाटनानंतर आपल्या अध्यक्षीय भाषणात डॉ. देशमुख म्हणाले, "गोव्याविषयी शालेय वयापासून जे ऐकले त्यामुळे या प्रदेशाबद्दल एक गाढ आत्मीयता मनात निर्माण झालेली होती, परंतु प्रत्यक्षात या भूमीचे दर्शन घेण्याचा योग आला नव्हता." (मडगावजवळच्या कोलवा किनाऱ्यावर झालेल्या एका भोजनसमारंभाच्या वेळी, त्यानी संभाजीने कुंभारजुव्याच्या खाडीत घोडा घातल्यावेळी खंडो बल्लाळाने त्याचे प्राण वाचविल्याची गोष्ट आपण वाचलेली असल्याचे सांगितले, आणि ती आपल्या पत्नीला इत्यंभूत कथन करून गोव्याच्या इतिहासाच्या आपल्या अभ्यासाची साक्षही उपस्थितांना दिली ! )

गोव्याच्या भावी विकासाला अनुकूल अशी सामाजिक संबंधांची एकमेवता आणि नैसर्गिक साधनसामुग्री या प्रदेशाला लाभलेली आहे; परंतु याबाबत तज्ज्ञांकडून शास्त्रशुद्ध योजना होणे आवश्यक आहे असे डॉ. देशमुख म्हणाले. ( संस्थेचे अध्यक्ष श्री. गोविंद रामनाथ कारे यानी आभारप्रदर्शन केल्यानंतर राष्ट्रगीत होऊन कार्यक्रम संपला.)

पहिल्या दिवशी रात्री स्थानिक कालावंतांनी विश्राम बेडेकर यांच्या ' वाजे पाऊल आपुले हा विनोदी नाटकाचा बहारदार प्रयोग सादर केला. यात प्रमुख भूमिका करणारे उपेन्द्र कृष्ण नायक हे गोमंत विद्या निकेतनाच्या इमारतीचे बांधकामतज्ज्ञ आहेत. ( वास्तुरचना श्री. कुराडे यांची. ) त्यानी व भिकू पै आंगले यांनी प्रयोगात विशेष रंग भरला.

दुसऱ्या दिवशी दुपारी डॉ. देशमुखांच्या अध्यक्षतेखाली एका अभिनव विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आलेला होता "आजच्या शिक्षणाने सामाजिक सुसंस्कृतता वाढली आहे काय ?" यात गोव्याचे शिक्षणमंत्री श्री० गोपाळकृष्णराव मयेकर, कविवर्य बा. भ. बोरकर, प्रा० मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष, प्रा० ग. य. कामत व सौ० दुर्गाबाई देशमुख यानी भाग घेतला.

बदलत्या काळाप्रमाणे शिक्षणपद्धतीत उत्क्रांती होत गेली तरी या काळाशी सुसंवाद साधताना आवश्यक अशा मूलभूत मानवी मूल्यांचे जतन करावयास आपण विसरलो असा विचार श्री. मयेकर यानी व्यक्त केला. कविवर्य बोरकरांनी अशी तक्रार केली की आजच्या युगात माणसाच्या अंगच्या उपजत गुणांपेक्षा त्याच्या शैक्षणिक पदवीलाच अवास्तव महत्त्व दिले जाते. प्रा० राजाध्यक्षांनी आपल्या भाषणात आजच्या सदोष शिक्षणपद्धतीचे मर्मभेदक विवेचन केले. आज उदरनिर्वाहाचे साधन म्हणून शिक्षणाकडे पाहिले जाते. सुसंस्कृतपणाचा विचार तरुण मनात रुजला जावा असे काही या शिक्षणपद्धतीत नसते. सौ. दुर्गाबाई देशमुख आणि प्रा० कामत यानीही आजच्या शिक्षणपद्धतीमागील दृष्टिकोणाच्या संकुचितपणाकडे श्रोत्यांचे लक्ष वेधले.

या अतिशय रंगलेल्या परिसंवादाचा समारोप करताना डॉ० देशमुख म्हणाले, की आजकाल शिक्षणाच्या क्षेत्रातसुद्धा राजकारण माजू लागले आहे. सांकेतिक पद्धतीने माध्यमिक शिक्षण देण्यावर पैसा खर्च केला जातो, परंतु लोकप्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार प्राप्त झालेल्या प्रौढ, निरक्षर नागरिकांला सर्वार्थाने सुशिक्षित बनविण्यासाठी मात्र पुरेसा पैसा दिला जात नाही. विज्ञानामुळे जगाला जर विपरीत बुद्धीच सुचणार असेल तर शिक्षणाद्वारेच मानवतावादाचे गुण तरुण पिढीच्या अंगी बाणवले जातील अशी सोय करावयास पाहिजे.

या रात्री गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाविभागाने कै० भोव्यांच्या 'धन्य ते गायनी कळा'चा प्रयोग सादर केला. १९६८ च्या फेब्रुवारीत मडगावच्या इस्पितळातच भोव्यांचे निधन झाले याची आठवण सर्वांच्या मनात जागती होती.

ता० १५ डिसेंबर रोजी संध्याकाळी 'आजचे मराठी नाटक' या विषयावर परिसंवाद झाला. आयोजित केलेले दोन वक्ते अनुपस्थित असल्यामुळे श्री० गोपाळ मयेकर याना ऐन वेळी परिसंवादात भाग घेण्याची विनंती करण्यात आली, आणि ती मान्य करण्यात त्यानी मनाचे मोठे सौजन्य दाखविले. आपल्या भाषणात त्यानी आजच्या मराठी रंगभूमीवर प्रचलित असलेल्या वाङ्मयीन, कलात्मक आणि तंत्रविषयक प्रवृत्तींचा ऊहापोह केला. श्री० ज्ञानेश्वर नाडकर्णी यानी परिसंवादास सुरुवात करताना कालच्या व आजच्या मराठी नाटकाच्या तुलनेने आपल्या मनात उभ्या राहिलेल्या काही शंका प्रकट केल्या.

परिसंवादाचे अध्यक्ष होते श्री. मो० ग० रांगणेकर. त्यानी स्पष्ट सांगून टाकले की, पूर्वीच्या नाटककारांसारखा आजच्या नाटककारांनी आपला स्वतंत्र कालखंड निर्माण केला नाही. त्यांच्या मते 'आजचे मराठी नाटक' हा नेमका ओळखायला कठीण असा एक संमिश्र प्रकार होता. श्रोत्यात बसलेल्या पु. ल. देशपांड्यांचा उल्लेख करून श्री. रांगणेकर असे म्हणाले की, "नाटककार म्हणून यानी अजून आमच्या अपेक्षा पुऱ्या केलेल्या नाहीत !"

याच रात्री पु. लं. च्या 'हसविण्याचा माझा धंदा' या साभिनय वाचनाच्या कार्यक्रमाचा प्रयोग झाला. पु. ल. देशपांड्यांची ही गोव्याला १७ वर्षांनी भेट, आणि तही या सोहळ्याच्या निमित्ताने आले तरी गोमंतकाच्या निसर्गरम्य परिसरात बरेच दिवस रेंगाळले. 'गोमंत विद्या निकेतन'च्या सुवर्णमहोत्सवाचा समारोपही त्यानीच ता. १६ डिसेंबरच्या रात्री केला.

संस्थेने या समारंभानिमित्ताने विद्यार्थ्यांची एक वक्तृत्वस्पर्धाही आयोजित केलेली होती. त्याचप्रमाणे 'चवथीचो चंद्र' या कोकणी प्रहसनाचा देखणा प्रयोगही तिने सादर केला.

गोव्याबाहेरून या समारंभासाठी मुद्दाम आलेल्या पाहुण्यात नाटककार वसंतराव कानेटकर यांचाही अंतर्भाव होता. या समारंभाच्या यजमानपणाची फार मोठी जबाबदारी संस्थेचे कार्याध्यक्ष श्री. गोविन्द रामनाथ कारे आणि त्यांचे निस्पृह सहकारी कार्यकर्ते श्री. रामकृष्ण नायक, डॉ. गोविंदराव काणे, श्री. वसंतराव रासईकर, श्री. भिकू पै आंगले, श्री. रामनाथ कारे, श्री. दामोदर का नायक, श्री. पुंडलीक नायक, श्री. प्रभाकर आंगले आणि इतर अनेक तरुण यांनी अतिशय उत्साहाने यशस्वी रितीने पार पाडली. तसेच मुंबईच्या धि गोवा हिंदू ॲसोसिएशनच्या कलाविभागाचे लाभलेले संपूर्ण सहकार फारच मोलाचे होते, आणि मडगांवचे प्रमुख नागरिकही पाहुण्यांची देखभाल तत्परतेने करीत होते. या सर्वांचे हार्दिक अभिनंदन ! ● ● ●

# शिस्तीमुळे राष्ट्राची उभारणी होते

जे लोक महान राष्ट्राची
अपेक्षा करतात
त्यांच्यासाठी
सार्वजनिक शिस्तही
अपरिहार्य अट आहे.



महात्मा गांधी



MAHATMA GANDHI
BIRTH CENTENARY
OCT. 2, 1968 TO
FEB 22, 1970

महात्मा गांधी
जन्म शताब्दी
अक्तूबर 2, 1968 से
फरवरी 22, 1970



अनुक्रमणिका










# छत्रपति शिवराय
## यशवंतांचे यश (आणि मर्यादाही)

महाराष्ट्र कवि यशवंत यांचे नाव आणि काव्य ह्यांचा परिचय नव्याने करून देण्याची तशी गरज नाही. वय वाढते. काळ बदलतो. कालमानानुसार साहित्य-कला—जीवनविषयक सिद्धांतातही बदल होत जातात. आजचे नवे उद्या जुने होत जाते आणि पुन्हा जुने होण्यासाठी काही-तरी नवे-नवे जन्म पावतच असते. पण प्रत्येक 'काल'च्या खांद्यावर आजचे 'आज' उभे आहे हे कृतज्ञ समाज मानीत असतो. त्यादृष्टीने विचार करता रवि-किरण मंडळ, मंडळातल्या सदस्य कवींची कविता, आणि त्यांनी काव्यक्षेत्रात आण-लेले तत्कालीन नवे (व आगळे) आज कालाच्या ओघात काहीसे मागे पडत असलेले दिसत असले तरी काव्यविषयक निष्ठा व श्रद्धा जोपासण्याचे फार मोठे कार्य रविकिरण मंडळाने व त्यातील कवि सदस्यांनी काव्यरचना व काव्य गायना-द्वारे केले ही गोष्ट निर्व्याज मनाने मान्य करायला हरकत नाही. यशवंत हे रविकिरण मंडळाचे एक भूषण. गेली पन्नास वर्षे ते काव्यरचना करीत आहेत. त्यांच्या प्रतिभेला खंड – दीर्घ काव्याचे आकर्षण आहे. त्या आकर्षणातूनच काव्यकिरीट, बंदीशाळा, जयमङ्गला आदि खंडकाव्ये त्यांचे हातून लिहिली गेली. त्या रचनांनी त्यांच्या विषयीच्या अपेक्षा वाढलेल्या असल्यामुळेच मर्ढेकरांसारख्या कवीने स्वतःच्या आजारपणातही यशवंतांची भेट घेऊन "तुमच्या कडून आम्ही महा-काव्याची अपेक्षा करीत आहो" अशी अपेक्षा व्यक्त केली. कै. स. गो. वर्वे ह्यांनी ह्या काव्याच्या निर्मितीसाठी शांत वाता-वरण व वास्तूची हमी दिली. हा विश्वास यशवंतांनी स्वतःच्या काव्यसाधनेने दिला आहे ही गोष्ट निर्विवाद मान्य करायला हवी. चाफळच्या खोऱ्यातल्या ह्या कवीला 'मऱ्हाठी' इतिहासाचे आकर्षण 'स्वाभाविक' रीत्याच होते. ते मधुनमधून काही स्फुट कवितेच्या रूपाने अभिव्यक्तही झाले होते. परंतु कवीची झेप मोठी होती. त्यातून एक महाकाव्य जन्माला आले. त्याचे नाव आहे 'छत्रपती शिवराय'!

## रविकिरण मंडळाचेच पुष्प

काव्यविषयक श्रद्धा जपत असताना मंडळाविषयक श्रद्धाही त्यांनी जपल्या ह्याचे निदर्शक म्हणून की काय हा ग्रंथ रविकिरण मंडळाचे "बावन्नावे पुष्प" म्हणून प्रकाशित झाला आहे. छत्रपती शिवराय हा विषय महाकाव्यास कसा योग्य आहे हे (निदान आता तरी) महाराष्ट्रात सांगण्याची गरज नाही. प्रस्तुत ग्रंथात महाराजांची कुंडली दिली आहे. त्या कुंड-लीतला ग्रहयोग काय आहे ते मला ठाऊक नाही. (ज्योतिष कळत नाही) पण तूर्त इथे प्रांती महाराजांचे 'स्टार्स' बरे आहेतसे दिसते. त्यामुळे शिवगीता—गीतशिवायन इत्यादि प्रयोग होत आहेत. परंतु कवि यशवंतांनी "निवडक" प्रसंगावरची "भाव-गीते" रचण्यात (गायकांची सोय व चाली घेऊन) समाधान मानलेले नाही हे समा-धान फार मोलाचे आहे असे मी मानतो. गेयता व तदनुषंगिक लोकप्रियता हा त्यांनी महत्त्वाचा निकष मानला नाही हे यशवंती प्रतिभेच्या प्रगल्भतेचे, पक्वतेचे लक्षण आहे म्हणून मी त्यांचे प्रथमच अभिनंदन करतो. शिवचरित्राचा खूपसा तपशील आता हाती आलेला आहे. तो सारा तपशील सांगताना तत्कालीन माण-सांच्या भावभावना, प्रतिक्रिया—क्रियांचा मागोवा घेत इतिहासाचे पानन् पान उल-गडून दाखविणे अत्यंत अगत्याचे होते. यशवंतांच्या प्रमुख काव्यात नुसती 'निवे-दने' नाहीत 'सनावल्या' नाहीत, वृत्त-पत्रीय 'आलेख' नाहीत, तर त्या त्या घटनात शिरून त्यातले काव्य-नाट्य शोध-णारा 'डोळस' प्रयत्न दिसतो. आणि 'शिवचरित्र' सनावल्यांसकट पाठ अस-णाऱ्या माणसालाही हा भाग खासच नवीन व हृद्य वाटेल.

महाराष्ट्राच्या कडेकपारीतून 'नवा इतिहास' घडविणारी 'हरहरमहादेव' ही गर्जना घुमली. त्या कडेकपाऱ्यांना वाचाळ करण्याचा प्रयत्न कवि करताना दिसतो.

डोंगरांनो, कां उभे ? सांगाल का काही मला —
तीनशे वर्षांचिया जो मागला तो मामला ?

अगत्याने केलेले आवाहन ऐकल्यानंतर साहजिकच —

परि दाविता— अगत्य कोणी
जाते म्लानता विरघळोनी
उचंबळोनी अंतर येते
मिठी तोंडाची सैल पडते.
"किती खोलन दावू अंतर"
होई अधीर —— गिरिकंदर

आणि हे अधीर गिरिकंदर अवघी 'शिवगाथा' उपन्यासातच सांगून टाक-तात. पण गाथा मोठी – त्याचा तपशील सांगण्यासाठी पुढला प्रपंच घडतो. मग 'साक्षात्कारा'ची कथा सुरू होते. कोठल्याही क्रांतीच्या काळी वेदना, प्रबळ व्हावी



अनुक्रमणिका

लागते. जाणीवा उत्कट व्हाव्या लागतात. मने स्फोटक व्हावी लागतात. मालोजी-राजांना संतान नव्हते. पण वेदना प्रवळ झाली होती. मालोजीची व्यथा काव्यात्मरूप घेऊन अवतरली आहे. लौकिक चरित्राला मालोजीराजांच्या साक्षात्कारापासूनच संकेत व साक्षात्काराची 'अलौकिक' डव दिली गेली आहे. हे सारे वाचत असताना मला एक गोष्ट नेहमीच खटकत आली आहे ती ही की शिवराय व ] तत्कालीन माणसांना 'देवत्व' बहाल करण्याची कल्पना 'नवा इतिहास' निर्माण करण्याच्या कामात प्रेरक वा उपकारक ठरण्याऐवजी अनुपकारकच ठरण्याची अधिक शक्यता आहे. आपण 'देव'पण बहाल करून मोकळे होतो व 'जयंती'-पुरती मग आठवण ( 'तीही वार्षिक' ) उरते. मागाहून भाषणे करणाऱ्या कवि–कलाकार–इतिहासकारांनी हे टाळावे असे निदान मला तरी वाटत आले आहे. असो.

'छावणीवरची संध्याकाळ' ह्या कवितेत मला कवीचा कल्पनाविलास, कवीची वेदना ( इथे यशवंतांचीच 'युगंधराचे पालुपद' ही कविता आठवावी ) व रचनेची सहजसुभगता ह्याचा सुंदर प्रत्यय आला. "धरतीवर युद्धे होत नाहीत, लादली जातात" कित्येकदा न्यायासाठी क्वचित अन्यायासाठीही. पण धरतीची वेदना मात्र कुणीच विचारात घेत नाही. हा विचार कुणालाही पटेल असाच आहे. शिवरायांच्या जन्मानंतर कुंडलीतले गुण सांगताना एकेका ग्रहाचे वलस्थान त्यांनी फार सुंदर अशा काव्यात्म पद्धतीने सांगितले आहे. ( ऐका सूज्ञांनो ) शिवजन्मकालीन दुष्काळाचे वर्णन करताना कवि-प्रतिभेने अतिरंजन तर केले नाही ना ? अशी शंका मात्र मनाला चाटून गेली. तर जिजाईच्या 'स्तन्या' चे वर्णन करताना कविप्रतिभा तेजाळली ह्याचा प्रत्यय आला. जिजाई शिवाजीला ज्या कथा सांगते त्या कथा वस्तुतः नवीन नाहीत. पण त्या काव्यरूप घेऊन अवतरल्या आहेत त्या मात्र फारच सुंदर. इतक्या चांगल्या कथा ऐकून शिवराय 'शिवराय' झाले नसते तरच नवल ! ! ( बाल मनोभूमी माजी ) शिवराय–शहाजी संबंधातले काही किस्से सांगताना कविप्रतिभा अशीच बहरून आल्याची जाण मिळते. ते सांगत असताना कवि काही विचारही मांडून जातो. 'एकान्ता'बावत तो लिहितो—

'बैसले जाऊनी महाराज एकान्ती
एकान्ती अभिनव काहि कल्पना सुचती
वर्दळीमध्ये मिळते न जयाना वाट
ते विचार मौलिक भेटति एकान्तात
अंधःकारमय त्या प्रदीप्त एकान्तात
संदेश अनन्तातले गूढ मिळतात.

रोहिडेश्वरी मावळे जमवून शिवरायांनी मनीचा हेतू प्रगट केल्यानंतर कवीने शेवटी जो विचार मांडला आहे तो आजच्या–उद्यांच्या वा सार्वकालिक संदर्भातहि महत्त्वाचा ठरावा.

श्रद्धास्थाने हवीत मनुजा देवाधर्माची
उभारणी त्यांविना न होते अचाट
कार्याची ( पृष्ठ १२६ )

अफझलखान वध हे शिवचरित्रातले एक 'बहुगुणी' पर्व. त्यात कवि कलाकाराचे मन रमले नसते तरच नवल! 'महिपासुर मर्दिला' हा साराच सर्ग कवि यशवंतांची प्रतिभा, प्रयोगशीलता, नाटचगीतांवर त्यांचे असलेले प्रभुत्व व बारीकसारीक तपशील सजीव करण्याची किमया यांचा प्रत्यय देऊन जातो. समर्थ व मनाचे श्लोकांचा केलेला सूचक व उपकारक उपयोगही मला मनोज्ञ वाटला. पन्हाळगडी, पावनखिंड, शास्ताखानास शास्त केली ह्या क्रमानंतर यशवंत शिवचरित्रातल्या एका महान समर प्रसंगाकडे घेऊन जातात. तो म्हणजे महाराजांची आग्रा भेट ! सूर्यग्रहण, आग्र्याहून ह्या सर्गात ते 'महाकाव्य' ग्रथित झाले आहे 'आयोध्येला आले रघुनाथ' ह्या सर्गात स्वराज्याच्या पाठीशी उभ्या राहिलेल्या जनशक्तीचा जयजयकार गरजला आहे. समर्थभेट व तख्ती बैसले हे आणखी 'मोठे' प्रसंग! कळा ह्या लागल्या जीवा, आम्ही चाललो कैलासा' हे निर्वाणाचे गीत – शिवचरित्र संपते. पाचशे एकवीस पानी प्रपंच सरतो. एक महान जीवनाचा महान आलेखही संपतो. पुस्तक संपते. पण विषय संपत नाही. कारण ग्रंथ आशय घन आहे. त्यात मराठी कवितेबाबतचे खूपसे प्रयोग कवीने केले आहेत. कितीतरी प्रकाराने ही कविता नटविण्या–सजविण्याचा प्रयत्न कवीने केला आहे. नाटचगीतांचा सुरेख व सुयोग्य वापर कवीने केला आहे. हे करताना त्याने एक गोष्ट केली आहे ती म्हणजे विविध 'जातीं' चा, 'छंदां' चा, वृत्तांचा वापर ! माझ्या मते 'छत्रपती शिवराय' हा छंदशास्त्राच्या अभ्यासकांना एक संदर्भ ग्रंथ म्हणून पुढे मागे उपयुक्त ठरावा. हे करताना 'महाकाव्या'चेच सवाल कवीच्या डोळ्यासमोर असले पाहिजे असे मला वाटते.

उर्दू–फारशीचा वापर कवीने ठिकठिकाणी केला आहे. सर्वच ठिकाणी तो प्रस्तुत व काव्यदृष्टया उपकारकच ठरला आहे असे म्हणवत नाही. कित्येक ठिकाणी रचना खडबडित, गद्यप्राय व रूक्ष–वृत्तपत्रीय तपशील-वजा झाली आहे. काव्यतत्वज्ञानाचा वापर अधुनमधूनच चांगला केला गेला असला तरी सतत "दैवत" ही भूमिका घेतल्याने 'मानवी' पराक्रम घडला हा ठसा मनावर उमटविण्यात कवि यशस्वी झाला आहे असे म्हणता येत नाही. दुसरे उणेपण जाणवले ते असे की, शिवचरित्राचा तपशील कळला तरीही हे महाकाव्य उत्कट प्रेरणा जागृत करण्याचे कामी काहीसे कमी पडते. तपशील खूप आहे. अर्थातच त्याची भावगीते केली नाहीत हा दिलासा ! ! मोठा आणि महत्त्वाचा ! ! असे हे छत्रपती शिवराय महाकाव्य! प्रयत्न मोठा, संकल्प मोठा, झेप मोठी. त्यातल्या उणीवा मान्य करूनही "महान संकल्पा" चे स्वप्न पाहू शकणाऱ्या महाकवि यशवंतांचे मराठी साहित्य रसिक अभिनंदनच करतील. ह्या वयातही हे स्वप्न पूर्ण करून 'जिद्दी मऱ्हाटयाची जात यशवंतांनी सिद्ध करून दाखविली म्हणून अभिनंदन! ! यशस्वी 'पाठराखण केल्याबद्दल प्रकाशक अनंतराव कुलकर्णी यांचेही अभिनंदन !

**प्रभाकर अत्रे**

( **छत्रपती शिवराय**—महाराष्ट्र कवि यशवंत, प्रकाशक—कॉन्टिनेन्टल प्रकाशन, मूल्य २५ रुपये. )



**साहित्य संमेलन—**
**(मुक्काम–वर्धा)**

४८वे मराठी साहित्य संमेलन गाजले. तसे ते आधीही गाजत होतेच. संमेलनाध्यक्ष प्राचार्य पु. शि. रेगे ह्यांचे ठिकठिकाणी सत्कार झाले. सत्कारप्रसंगी भाषणे आलीच. त्यांपैकी काही भाषणात त्यांनी व्यक्त केलेल्या खंती त्यातल्या काहीशा कडक व बोचऱ्या शब्दप्रयोगांमुळे गाजल्या असल्या व त्याबद्दल काहींचे प्रामाणिक मतभेदही असले तरीही पण त्या सर्वस्वी खोटया नाहीत. पण ह्या बाबतची वेदिली ही अनेकविध कारणांनी आलेली आहे. 'असे होऊ नये वा व्हायला नको होते.' म्हणणे सोपे असल्याने सारीच मंडळी उद्वेगाने तसे बोलून जातात. पण 'असे व्हावे' 'असे करू या' असे प्रथमपुरुषी बोलणारे एकूण कमीच ! त्यामुळे "मागील पानावरून पुढे चालू" ह्या पद्धतीने ही साहित्य पंढरीची वारी प्रतिवर्षी भरते. आणि दिंड्या पताका घेऊन गेलेली माणसे "पांडुरंग भेटलाच नाही. फक्त कळस दिसला" असे म्हणत व हवापाणी व प्रेक्षणीय स्थळांची चर्चा करीत गावोगाव परतताना दिसतात. अर्थातच ह्यासंबंधी गेल्या अंकी काही लिहिले असल्याने ती चर्चा इथेच थांबवितो. आणि वर्धा येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्राचार्य रेगे यांच्या अत्यंत विचारघन व सुस्पष्ट अशा विचारांनी परिप्लुत अशा व्याख्यानाकडे वळतो. प्राचार्य रेगे हे स्वयंप्रज्ञ व स्वतंत्र अशा वृत्तीचे लेखक—कवि आहेत. अर्थशास्त्र हा त्यांचा विषय असला तरी साहित्य व साहित्यविचार हे त्यांचे श्वसन आहे. ती त्यांची श्रद्धा आहे. आणि त्यामुळेच त्यांच्या अध्यक्षीय भाषणाकडे मोठ्या उत्सुकतेने माणसे पहात होती. ते भाषण ऐकले (आकाशवाणीवर) आणि नंतर ते संपूर्ण भाषण वाचले. प्राचार्य रेगे यांच्या भाषणातला एक भाग अत्यंत मौलिक असा असून दुसरा भाग तात्कालिक स्वरूपाच्या काही योजनांचा विचार करणारा असला तरी तोही चिंतनीय असाच आहे. त्यातला साहित्यविषयक चिंतनाचा भाग साहित्यातल्या आत्माविष्कारासंबंधी असून साहित्याच्या एकूण निर्मिति–प्रक्रियेसंबंधीचा ठाम सिद्धांत मांडणारा तो आहे. प्राचार्य रेगे म्हणतात —"साहित्यात किंवा कलेत खरा आत्माविष्कार केव्हा होतो, जेव्हा त्यात साहित्यकाराचे किंवा कलाकाराचे 'स्व'त्व लोप पावलेले असते, जेव्हा आस्वादक आणि त्याच्याकरवी सर्व विश्वच तेथे साक्षीरूपाने वावरू लागते. जिथे 'स्व' नाही आणि तरीही आहे. आणि जिथे 'स्व' आहे आणि तरीही नाही अशा एका अलौकिक पातळीवर आत्माविष्कार होतो तेव्हाच खरी निर्मिती होते." हा ठाम सिद्धांत मांडून आत्माविष्काराच्या संकुचित कल्पनेवर प्राचार्य रेगे यांनी अत्यंत मूलगामी असा हल्ला चढविला आहे. तो चढविताना त्यांनी ज्ञानेश्वरी — हॅम्लेटची जी उदाहरणे दिली आहेत त्यातले व्यापक व अतिसूक्ष्म सत्य मनाला जाणवते. अंतर्मुख करते. साहित्य शास्त्राच्या दृष्टीने हा विचार अगदी नवा म्हणता येत नसला तरी आजच्या आत्माविष्कारासंबंधीच्या अति सामान्य व उथळ अशा कल्पनांवरील एक परखड असा लगुड प्रहार ह्या दृष्टीने त्या विचारातील चिंतनाला महत्त्व आहे असे मला वाटते.

साहित्याचे खरे गमक काय ह्याचाही रेग्यांनी घेतलेला शोध व केलेले विवेचन मर्मग्राही आहे. त्यांच्या चिंतनशीलतेची ग्वाही देणारे आहे. ते म्हणतात की, प्रत्येकाजवळ स्वतःला जाणून घेण्याची एक निगूढ प्रवृत्ती असते. आपण सतत काही तरी अधिक शोधत असतो. आणि हे जे 'अधिक' त्याचे जेथे किंचित दर्शन होते तेथे साहित्याचा स्पर्श झालेला असतो." त्या 'दर्शना'चीही त्यांनी सुंदर चिकित्सा केली आहे. प्राचार्य रेगे ह्यांचा हा सारा थेसिस मुळातूनच वाचण्यासारखा आहे. (स्थलाभावी सारा देणे अशक्य) 'साधना आवश्यक' असे म्हणत म्हणत त्यांनी साहित्यकाराला आवश्यक असलेल्या गोष्टींचा तपशील दिला आहे. तादात्म्य, प्रामाणिकपणा, विशाल अनुभव हे कदाचित आवश्यक असेल; परंतु मुख्य म्हणजे त्याची स्वतःवर श्रद्धा पाहिजे. ती त्याच्या वृत्तीचा अपरिहार्य भाग झाली पाहिजे. आपण जे लिहितो ते एक देणे आहे. आपण केवळ निमित्तमात्र आहोत अशा भावनेतून ती श्रद्धा गवसते असं ते म्हणतात. हा सारा 'थेसिस' फार मौलिक आहे. शासकीय पारितोषिकांबाबतचा त्यांचा विचार त्यांनी आधीच अनेकदा मांडला आहे. ग्रंथ प्रकाशने व ग्रंथप्रसार ह्या बाबतीतले त्यांचे सारेच विचार तात्विक दृष्ट्या पटले तरी व्यावहारिक तपशीलाबाबत अनेकांना ते तितकेसे रुचणार नाहीत. मुद्रण-सुलभतेमुळे प्रकाशन व्यवसाय जोरात असून तद्विषयक स्पर्धाही जोमात आहे. विषय अनेक, माध्यमे अनेक आणि हा सारा पसाराच मुळात 'मानवी' असल्याने तपशीलात अनेक अडचणी येण्याचा संभव आहे. साहित्य अकादमीने प्रारंभकाळी आणि उत्साहाने हाती घेतलेल्या योजनांबाबतचे प्राचार्य रेगे यांचे निवेदन सरकारी संबंधितांना 'आय् ओपनर' ठरावे. सर्वात महत्त्वाचा मुद्दा म्हणजे 'संस्कृत' बद्दलचा त्यांचा आग्रह. आजच्या भाषिक वादांच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय एकात्मतेला निःसंशय सहाय्यभूत ठरणाऱ्या

संस्कृतचे पुनरुज्जीवन हे उपकारक ठरे-लच ठरेल असे अनेकांचे मत आहे. त्या मताचा प्राचार्य रेगे यांनी हिरीरीने पुरस्कार केलेला पाहून त्यांच्या भाषणाच्या पूर्वार्धाप्रमाणेच उत्तरार्धही व्यापक भूमिके-वर गेलेला दिसतो. रेग्यांनी नवतेतील 'दारवेगिरी'बद्दलही ज्या कानपिचक्या दिलेल्या आहेत त्याही संबंधितांनी विचा-रात घेण्यासारख्या आहेत. आज त्या-बाबत आग्रही व एकांगी प्रतिपादन केले जात आहे व 'नवे'च वादात सापडले आहे. "आम्हीच ह्या पंथाचे शंकराचार्य आहोत" असाही दावा सारीच माणसे करताना दिसतात. तेव्हा काव्य कलांचे 'आद्यपीठ' कोणते ह्याचा मूलभूत सिद्धांतच रेग्यांनी मांडला हे उचितच ! !

प्राचार्य रेगे यांचे अभिनंदन !

## 'चंद्र'-मानव

आजच्या विज्ञान युगाचे एक अत्यंत महत्त्वाचे पाऊल अमेरिकेच्या अंतराळ-वीरांनी व अंतराळ संशोधक विज्ञान शास्त्र्यांनी टाकले आहे. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करायला शब्द अपुरे आहेत. विज्ञानाचे संशोधन, विज्ञानातले विजय (आणि पराजयही) हे कुणा एका राष्ट्राचे मुळी नसतात असे माझे मत आहे. कारण चंद्र लोकावर 'अमेरिकन' मानव गेला की 'रशियन' मानव गेला ह्या गोष्टीला तादृश महत्त्व दिसले तरी अंतिम विज्ञान विजयाच्या दृष्टीने चालणारे हे संशो-धन अखेरीस जगाचेच असते. आणि म्हणूनच अपोलो-अठला काही अडचणी आल्यास आम्ही योग्य ती मदत करू असे आश्वासन रशियाने दिले होते. आज राष्ट्राराष्ट्राच्या मर्यादांनी मानव बंदिस्त झालेला दिसत-भासत असला तरी ज्ञान-विज्ञान, कला, क्रीडा इत्यादि गोष्टींबाबत तो मुका आहे. वैश्विक आहे अशी माझी धारणा आहे. आणि म्हणूनच आजचे विशाल जग खूप जवळ आले आहे. ज्या तिघा अंतराळविरांनी हा विक्रम केला आहे ते अमेरिकन असले तरीही साऱ्या जगाने त्यांचा जयजयकार केला. भारतीय वृत्त-पत्रांनी तर ती वार्ता स्पेशल टायपात छापली. काहींनी लाल रंगात छापली (आणि सुवर्णाक्षरे नसल्याची खंतही व्यक्त केली) त्यांच्या ह्या चंद्र-प्रवासाची व पृथ्वीच्या कक्षेतून सुटून चंद्रापासून अवघ्या ६८ किलो मीटर अंतरावर त्याच्या भोवती फेऱ्या घालण्याच्या पराक्रमाची विस्तृत वर्णने वाचताना एखादी 'फेअरी टेल' वाचल्यासारखेच वाटत राहते. पण ते सत्य आहे आणि सत्य हे कधी कधी कल्पिताहूनही अद्भुत असते ह्याचा प्रत्यय देणारे आहे. ती कथा आणि गाथा मानवाच्या ज्ञानाने विज्ञानाच्या क्षेत्रात घेतलेल्या हनुमंत झेपेची गाथा आहे. विज्ञानाची ही विविध आव्हाने स्वीकारणारा जिद्दी व यत्नशील मानव मला अधिक मोलाचा वाटतो. जमिनीवर राहून, लौकिक जीवन जगत असतानाच आकाशातल्या अलौकिकाचा वेध घेत झेपावणारे हे गरुडच उद्याच्या अधिक संपन्न, समृद्ध व तेजाळलेल्या जगाचे अग्रदूत आहेत अशी धारणा मनात बाळगूनच मी त्या अग्रदूतांचे अभिनंदन करतो. हा जयजयकार करताना एक खंतही मनाला जाणवते. जगातले धाडसी तरुण चंद्र प्रवासाची स्वप्ने पहात अस-ताना आमचे विद्यार्थि मात्र 'हिंदी बातम्या, 'हिंदी आज्ञा', फी-वाढ, चॅन्सेलर्स कोण असावेत वगैरे सारख्या प्रश्नांवर आप-ल्याच पैशांवर, गाड्यादि मालमत्तेवर धाडी घालण्यात धन्यता मानीत आहेत. असल्या श्रेयांची स्वप्ने त्यांना कधीच पड-णार नाहीत ? भाषा, प्रांत, वेष इ० पेक्षा 'मानव' मोठा आहे. ज्ञान-विज्ञान मोठे आहे असे त्यांना कधीच वाटणार नाही ? पटणार नाही ? की थिटयांची स्वप्नेही थिटी म्हणतात हेच खरे मानावयाचे ! आम्हाला महामानवाचे, विश्वमानवाचे, चंद्र मानवाचे स्वप्न कधी पडणारच नाही ? गाड्या जाळणारे आमचे 'फॅनॅटिक' (आणि ल्युनॅटिकही) कधी त्याच (फॅनॅटिक) अवस्थेत कधी चंद्रावर झेपा-वत जाणारच नाहीत ? काळच देईल ह्या प्रश्नांची उत्तरे !

तूर्त आम्ही अमेरिकन अंतराळवीरांचे, अंतराळ संशोधन केंद्रातील विज्ञान-शास्त्र्यांचे, अमेरिकन शासनाचे व जनतेचे अभिनंदन करतो.

## न्याय आणि (सर्वोदयी) न्याय

मध्यंतरी एक प्रकरण खूप गाजले व अजूनही यातली "धग" संपलेली नाही. पण त्या प्रकरणातली (निर्माण करण्यात आलेली) हवा मात्र निघून गेलेली आहे असेच म्हणता येईल. ही हवा निर्माण कर-ण्यात मान्यवर सर्वोदयी नेते अग्रेसर होते व त्या मान्यवरांच्या मतांचा मागोवा घेत प्रारंभी वृत्तपत्रांनीही संवादी' स्वर छेडले होते हीही गोष्ट नाकारण्यात तसा अर्थ नाही. पण "सर्वांनाच सर्व काळी फसवीत राहता येत नाही" ह्या म्हणीचा प्रत्यय ह्या प्रकरणीही आला आणि अखेर 'सर्वोदयी' हवा गारठून-गोठून गेली असेच दिसते. खानदेशातले एक सर्वोदयी कार्यकर्ते, हुशार व ज्ञानी शेतकरी श्री. देव-राम नारखेडे ह्यांनी आपल्या बंधूंच्या सुटकेसाठी आमरण उपोषण सुरू केले. आणि ही उपोषणे 'जशी' सुटतात तसेच तेही सुटले. परंतु उपोषणातून अनेक 'मौलिक' गोष्टी बाहेर आल्या आणि बंधू सुटले नसले तरी ती 'चर्चा' मात्र भारतीय न्याय खाते, न्यायशास्त्र, लोक-शाही इत्यादि अनेक गोष्टींवर नवा प्रकाश पाडू शकली. नारखेडे बंधू कदा-चित सुटतील वा सुटणार नाहीत; पण मराठी वृत्तपत्रकारांनी ह्या प्रकरणाच्या अनुषंगाने जे मनोधैर्य व्यक्त केले आहे, त्याबद्दल त्या त्या वृत्तपत्रांच्या संपादक-सहसंपादकादि सहकाऱ्यांचे मी मनःपूर्वक अभिनंदन करतो. महाराष्ट्र टाइम्सचे संपादक गोविंद तळवलकर व लोक-सत्तेचे सहसंपादक अनिरुद्ध पुनर्वसु यांनी ह्याबाबत बजावलेली कामगिरी स्पृह-णीयच म्हणावी लागेल. प्रारंभी म. टाइम्सकारांनीही नारखेडे यांचा पक्ष घेऊन व्यापक मानवतावादी दृष्टिकोन मांडला होता. परंतु धुळ्याच्या एका पत्रलेखकाने जेव्हा काही सडेतोड (व










बिनतोड ) सवाल टाकले तेव्हा सत्य समजून घेण्यासाठी तळवलकरांनी त्वरित व कसोशीचे प्रयत्न केले. खुद्द नारखेडे यांची भेट घेतली. त्यांची भूमिकाही प्रसिद्ध केली. संपूर्ण खटल्याची माहिती दिली. अग्रलेख लिहिले. आणि नारखेडे यांच्या भूमिकेवरही अत्यंत तर्कशुद्ध पद्धतीने विवेचन करणारा लेख लिहिला. अविरुद्ध पुनर्वसू यांनी लोकसत्तेत सतत तीन लेख लिहून "नारखेडे सत्य लपवीत आहेत" अशी ठाम भूमिका घेतली. त्या निमित्ताने काही वाचक व वकीलांनीही मतप्रदर्शन केले आहे. म. टाइम्समधील नारखडे यांचा लेख वाचल्यानंतर तर त्यांच्या हेतूविषयीचे सारे संशय फिटतात. न्यायालयात संपूर्ण दोषीत्व सिद्ध झाल्यावर केवळ 'दया' मागणे येवढेच उरते. परंतु सरळ सरळ 'दया' न मागता उपोषणाच्या मार्गाने सामाजिक सहानुभूती मिळविण्याचा नारखेडे यांनी प्रयत्न चालविला. आणि फक्त आपल्या दोन भावांपुरता 'न्याय' मागण्याची भूमिका स्वीकारली. न्यायालयाने दोषी ठरवून शिक्षा दिलेल्या माणसांना 'दया' दाखविण्याचा अधिकार शासनाला आहे. पण 'नारखेडे प्रकरणी'ची चालवाजी कदाचित 'सर्वोदयवादी' म्हणून काही काळ सहानुभूती मिळवू शकली असली तरी आता उघडी पडली आहे. आणि ह्या प्रकरणीची ही भोंगळ व अस्थानी वाहणारी सहानुभूती तर्कशुद्ध, न्यायाधिष्ठित चिकित्सेने थोपवून परतविण्याचे 'जागल्या'चे कार्य तळवलकर–पुनर्वसूनी ( मुंबईपुरते तरी) केले आहे. सामान्य माणसे जेव्हा भ्रमितचित्त होतात तेव्हा अशा 'जागल्यां'चीच समाजाला गरज असते. मात्र कधी कधी प्रश्न पडतो तो असा की, न्यायालयात सर्व पुराव्यानिशी दोषी ठरलेल्या देवराम नारखेडे यांना दया दाखवावी व सोडून द्यावे असा प्रयत्न तरी काका गाडगीळांसारख्या थोरा मोठ्यांनी कां करावा ? आण त्यांच्या ज्ञानाचा उपयोग जर शेती वा समाजकार्याचे दृष्टीने व्हावा असाच त्यांचा हेतु असेल तर तसे काही देवराम नारखेडे यांच्या वावतीत घडले आहे काय ? नसल्यास कां नाही ? ह्या प्रकरणाचे निमित्ताने मराठी पत्रसृष्टीची जी 'जागल्या' वृत्ती दिसली तिचे आम्ही स्वागत करतो. हाच तर पत्रसृष्टीचा खरा धर्म आहे.

—सारस्वत

---

(पृष्ठ ५७ वरून–**कादंबरी**)

"आता वायका माणसाना चढवा."

पहिला खटारा तयार झाला. तरी वायका माणसं उरलीच. म्हणून नामा गुरवाने आपली जोडी जुंपली.

"पन आमची भांडीकुंडी—"

"आता प्राणाशी गाठ आल्याय नि तुम्हाला भांडीकुंडी सुचताहेत."

"पन आपला संसार हाये त्यो."

"आग लावा त्याला !"

बाबीशेट डोईस रुमाल गुंडाळून तयार झाले. काका कवजा घालून उभे राहिले. वाटुळकरमामा तांदुळाची पिशवी घेऊन तयार झाले. मंजि आणि नामा गुरव खटाऱ्यांवर बसले.

"सर्व माणसं तयार झाली ?"

"झाली."

कुणी मागे राहिलं नाही ना ?"

"नाही."

"बरं, सर्वांनी गुरांना घेतलं बरोबर ?"

"हो".

"आनंद आहे ! आता निघायचं."

"पण नक्की कुठे जायचं ?"

"काका आपले पुढारी. त्यांच्या मागून निमूटपणे निघायचं."

"चालेल."

"नि पोरावाळांचं पाणी घेतलं ?"

"घेतलंय."

"मग काका, तुम्ही सर्वात पुढे व्हा."

"नि तुम्ही बाबीशेट ?"

"मी सर्वात मागे राहातो."

"तुम्ही-या ना पुढे.

"नको. मी ताम्हनात देवं घेतल्यायत बांधून."

"काय पाळी आली बघा !"

"आता देवाचे आभार मानायचे कारण त्याने आम्हाला हातीपायी तरी सुखरूप ठेवलंय."

"तेही खरंच म्हणायचं."

"नामा, सर्वाच्या वतीनं गाऱ्हाणं घाल बाबा. म्हणाले. निघायला मोकळे झालो आपण."

नामा गुरवाने खणखणीत आवाजात माणसाना, त्यांच्या मुलावाळाना, गाईवासराना, झाडामाडाना, सुखात ठेवण्याचं गाऱ्हाणं चिवाईच्या देवळाकडे पुढा करून घातलं.

आणि मग खाली माना घालून पराभूत गाववाल्यांची यात्रा अंधुकशा चांदण्यात सुरू झाली. काका सर्वांना संभाळून नेऊ लागले. हुं कीं चूं न करतां सर्वांनी नवा अध्याय सुरू केला.

मारेकऱ्यांना मैदान मोकळं झालं. तुळसकरांच्या पडवीवर ते आरोळ्या ठोकीत नाचले. मोठमोठ्याने गायले.

गावातली सगळी कुत्री जमा झाली आणि तीसुद्धा भुंकू लागली.

(क्रमशः)

# 'ब्रह्मचारी'चा 'नाटकी' अवतार

कथेचे नाटक, कादंबरीचे नाटक, एकांकिकेचे नाटक, लावणीचे नाटक इत्यादि मार्गांनी वरीचशी नाटके मराठी रंगमंचावर आली आहेत. 'संत सखू'चा 'प्रीतिसंगम' झाला आणि आता 'ब्रह्मचारी' चित्रपट रंगमंचावर आला आहे. लेखक अर्थातच आचार्य अत्रे. निर्मिती–अत्रे थिएटर्स. दिग्दर्शिका – सौ. शिरीष पै. अशा सवकुछ 'आचार्य अत्रे' ह्या थाटामाटात हा ब्रम्हचारी आता रंगमंचावर आला आहे. 'ब्रम्हचारी' चित्रपटाचा काळ १९३६–३७ चा. स्वातंत्र्यपूर्वकालाची अनेक 'फॅडस्' त्यात टिंगलीचा विषय झाली होती. त्यामुळे त्याला एक वेगळेच 'अपील' होते. स्वातंत्र्योत्तर काळात अनेक भ्रम नाहीसे झाले आहेत. वरेचसे आचार्य दिवंगत झाले आहेत. जे सुदैवाने हयात आहेत त्यांना पूजेची दैवते ह्या पलिकडे फारसे 'ग्लॅमर' राहिलेले नाही. 'प्रतिज्ञा' ही घ्यायची व पाळायची गोष्ट असते ही कल्पना आता आउटडेटेड झाली आहे. मुळात 'प्रतिज्ञा' हा विषय लोकांनी डोक्यातून काढून टाकला आहे. त्यामुळे 'ब्रम्हचारी' हा चित्रपट आणि त्याचे आलेले नाटक ह्यांच्या अंगभूत रंगतीत काही फरक पडणे अपरिहार्य झाले आहे. अर्थातच फॅडस्‌चे स्वरूप वदलले तरी 'फॅडस्' ची वृत्ती ही 'वैश्विक' असल्याने, सनातन असल्याने हा विषय तसा जुना होत नाही, झाला नाही. दोन्हींचे संवाद आचार्य अत्रे यांच्या हुन्नरी, कसवी, खुमासदार लेखणीने लिहिले गेले असल्याने व त्यात काल व नाटचानुसारी आवश्यक ते वदल केले गेलेले असल्याने 'ती' रंगत कयमच राहते. पण हे पहात असता एक गोष्ट मात्र जाणवत होती. ती अशी की 'सीन्स'ची चित्रपट वा जुने नाटचतंत्र सूचित करणारी पद्धत अंगिकारण्याऐवजी काही नव्या प्रयोगांचा वापर झाला असता तर प्रवेशात्मक जुनेपणही गेले असते. आणि चित्रपटाच्याच प्रसंगांचा एक आगाऊ असा कलापूर्ण वापर झाला असता. असे असले तरीही नाटकाची पकड कायम राहते व ह्याचे श्रेय. गतिशील व प्रत्ययकारी दिग्दर्शनाला म्हणजे सौ. शिरीष पै ह्यांना आहे. ह्या नाटकाबाबत जनमानसात 'तुलना' घोळणार हे आचार्य व शिरीष पै यांनी ओळखले आहे ह्याचा चांगला प्रत्यय येतो. चित्रपटाला 'स्टार कास्ट' लाभलेली होती. मीनाक्षीसारखी नवीन नायिका, तिचेच गाणे, विनायक, दामुअण्णा मालवणकर, जोग, साळवी वगैरे गुणी कलाकार त्यात होते. आजच्या नाटकात तशी 'स्टार कास्ट' नसल्याने आजचे आव्हान अधिक मोठे होते असे म्हटले तर वावगे ठरू नये

विश्वनाथ वागूल ( नायक ), ललिता देसाई ( नायिका ), उदय गोडबोले (चकोर), दिनेश करमरकर (चंडीराम), इत्यादि कलाकार तसे फार नामवंत नव्हेत. वागूलांना आपण गायक म्हणून ओळखतो. ललिता देसाई ह्या मुख्यतः चित्रपटातल्या. उदयराज गोडबोले हेही मुख्यतः गायकच. त्यातून हे नाटक उभे करायचे होते. पण सौ. शिरीष पै यांनी खूप मेहनत घेऊन ते चांगले बसवले आहे गति चांगली आहे. वागूल प्रयत्न चांगला करतात. विनायकांचा नायक 'इनोसंट' वाटत असे वागूल सर्वच प्रसंगात ते वेअरिंग कायम




ठेवू शकत नसले तरी प्रयत्न खूपच चांगला. पोहण्याच्या ड्रेसात ललिता देसाई शोभून दिसल्या. कामही चांगले केले. उदय गोडबोले यांचा 'फार्सिकल' चकोर चांगला वाटला. गाणे चांगले पण हातवारे इतके हवेतच का? धवधव्याचा सीन नेपथ्यकार वरणगावकर यांनी चांगला उभा केला. टाळी घेतो तो. येवढ्या मोठ्या धवधव्याबावत 'पाण्या'चा अधिक 'सजीव व वोलका' आभास उत्पन्न करणे मात्र अगत्याचे वाटते. 'यमुना जळी'ची चाल कायम ठेवून ते गीत नव्याने म्हणवून घेतले असते तर ? दादा चांदेकर यांची कामगिरी तशी चांगलीच म्हटली पाहिजे. ब्रम्हचारीच्याच उत्सुकतेने लोक ह्या 'नाटकी' ब्रम्हचारीला भेट देणार. त्याचा सहवास ( खमंग व खदखदविणारा ) लुटणार व आचार्य अत्रे व सौ. शिरीष पै ना धन्यवाद देत ( हसत ) घरी परतणार हे निश्चित ! !

त्या दोघांचेही व कलाकारांचे अभिनंदन ! !

—चित्रगुप्त

---

(पृष्ठ ६१ वरून–**सन्मानपुष्पे**)

व्यक्तित्वाला संपन्नता देऊ शकले आहे. अमृतानुभवातली एक ओवी त्यानी इतकी सहजतेने व ससंदर्भ मांडली की, ते ऐकून मन थक्क झाले. आयुष्यातल्या योगायोगांची एक विचित्र व गमतीदार माहिती देताना त्यांनी "आठ" ची कथा सांगितली. १७ मे १९१६ ला जन्म, १७ नोव्हेंबरला आर्ट स्कूलची नौकरी, १७ जानेवारी १९५० ला मुंबई, कलकत्ता येथील प्रदर्शनात सुवर्णपदके मिळाली, लंडनला १७ नंबरच्या खोलीत ( हॉटेलच्या ) वास्तव्य, ती परिषद ८ ता. ला सुरू झाली. १९५२ ते १९६० वरसोवा येथे वास्तव्य, ६० ते ६८ महालक्ष्मीला वास्तव्य, आर्टस्कूलचे ते १७ वे डीन आहेत, २६ डिसेंबरला कामाचा चार्ज घेतला व ८ जानेवारीला ते डीनच्या बंगल्यात रहायला आले. ज्योतिषावर श्रद्धा असणारा, पण स्वतःच्या जिद्दी व प्रयोगशील स्वभावामुळे 'जीवन' घडवू शकलेला हा कर्तबगार पुरुष मात्र स्वतःकडे कमीपणा घेऊन म्हणत होता, "आर्ट स्कूलच्या प्रत्येक दगडाने मला खूप खूप शिकविले आहे. आर्ट स्कूलच्या दगडाशी, वास्तूशी, भोवतालच्या झाडा–वेलींशी, विद्यार्थ्यांच्या हर्षामर्षाशी आणि स्वप्न–ध्येयांशी इतका तादात्म्य पावलेला अधिष्ठाता मिळाल्यावर–आर्ट स्कूलची वास्तु हसली नसती तरच नवल ! ! अनेक चांदीची, सोन्याची, ब्राँझची पदके मिळविलेला हा कलाकार आता त्या क्षेत्रातला 'डीन' शिपचा सर्वोच्च मान मिळविता झाला आहे. 'माझ्या चपराशाला यापेक्षा जास्त पगार मिळतो म्हणणाऱ्या एका थोर चित्रकाराला तितक्याच ताठपणे, ध्येयनिष्ठ उत्तर देताना पळशीकर म्हणाले होते –" चित्रकलेच्या बाबत तुम्ही तुमच्या चपराशाशी सल्ला मसलत करणार नाही. माझ्याशी मात्र करावीच लागेल." ह्या वाक्यात कलेचा सार्थ अभिमान व ध्येयवाद दिसून येणारे जिद्दी व संपन्न व्यक्तित्व !

—आदित्य

(पृष्ठ १० वरून)

कारण निदान तूर्त तरी अँग्लोअमेरिकनांना आशियात आपण दुर्बल झालो ही जाणीव आली आहे हे होय.

## रशियाला भारताची मैत्री हवी

भारताच्या दृष्टीने ही परिस्थिती मुळीच वाईट नाही. पण रशियाचे धोरण भारतासंबंधीचे कसे राहील ? त्यानेच अमेरिकेप्रमाणे पाकिस्तानला पाठिंवा दिला तर ? या प्रश्नाचे उत्तर रशिया-चीन संबंधात सापडते. एकवीस वर्षापूर्वी रशिया भारत विरोधी होता. पण तरीही भारताने रशियाशी मैत्रीच साधण्य चा निर्धार केला. त्यात बरीच दूरदृष्टी होती. कम्युनिस्ट चीन १९४९ साली जन्मास आला तेव्हा तोही भारत विरोधीच होता. भारताने कम्युनिस्ट राष्ट्रांशी मैत्री न करता अमेरिकेशी मैत्री करावी अशी अँग्लो अमेरिकनांची इच्छा होती. भारताने तसे केले असते तर रशिया व चीन या दोन बलाढ्य राष्ट्रांचे संयुक्त वैर भारतास ओढवून घ्यावे लागले असते. त्यामुळे काश्मिरात अमेरिकन संरक्षण तळ आला असता व अमेरिकेचे साहाय्य भरवशाचे नाही हा अनुभव कोरिया व व्हिएतनाम यांना आला तसा भारताला येऊन भारताचा विस्तीर्ण ' व्हिएतनाम ' झाला असता. रशियालाही ती परिस्थिती धोकादायक झाली असती. कारण रशिया व चीन यांच्यात भौगोलिक कारणांनी, ऐतिहासिक कारणांनी व लोकसंख्या कारणांनी एक शतकाहून अधिक काळ वैर धुमसत असून दोन्ही देशातील कम्युनिस्टांनी हा वैर वारसा उघड नव्हे तरी गुप्तपणे चालविला होता. या दोन देशांतील सरहद्द साडेचार हजार मैल असून रशियन हद्दीत जागोजाग एक लाखांहून अधिक चौरस मैल प्रदेश चीनचा रशियाने इतिहासकाळात बळकावलेला असा आहे. तो सामाने वा दंडाने चीनला परत मिळवायचा आहे. रशियाची लोकसंख्या फार थोडी असून कमी वेगाने वाढते. आणि आशियातला रशियाचा प्रचंड प्रदेश जवळ जवळ निर्जन असून चीनमध्ये अगदी उतू चाललेल्या लोकसंख्येला तो वसाहतीला भरपूर व नजिक आहे. म्हणून भारताने रशियाशी मैत्री न करता अमेरिकेशी केली असती तर रशियाला अमेरिकेपासून आपला बचाव करण्यासाठी चीनशी सख्य करावे लागले असते व चीनने मैत्रीच्या आविर्भावाने रशियाला गळामिठी घालून आशियात रशियाला दुबळे केले असते. भारताने रशिया व चीन या दोघांशीही मैत्री साधण्याचा प्रयत्न केला व अमेरिकेला ( म्हणजेच पाकिस्तानला ) काश्मीर देण्याचे नाकारले. तसेच जागतिक शांततेचा पुरस्कार व प्रचार केला. रशियालाही युद्ध नको होते म्हणून भारताची भूमिका रशियाला पटली व अमेरिका आणि रशिया या दोन अतिस्पर्ध्यांविरुद्ध भारताची मैत्री रशियाला हितकर वाटली. तेव्हापासून काश्मीरप्रकरणी रशियाने भारताला सतत पाठिंवा दिला व आर्थिक व शस्त्रास्त्रीय साहाय्यही केले. भारत रशिया मैत्रीमुळे रशिया चीन वैरही वाढत गेले असून १९६२ साली रशिया क्यूबा प्रकरणी अॅटॉमिक युद्धात सापडणार असे दिसताच चीनने भारतावर स्वारी केली पण रशिया तिकडून मोकळा होताच चीनला भारतातून माघार घेणे भाग पडले. त्यानंतरच्या काळात रशियाने भारताला आर्थिक व शस्त्रास्त्रीय साहाय्य वाढविले आहे.

भारताच्या मैत्रीचा रशियाला व रशियाच्या मैत्रीचा भारताला विशेष उपयोग आहे. भारत लोकशाहीप्रधान असल्याने युद्धखोर व आक्रमक होणार नाही असा रशियाला भरवसा वाटत असेल. उलट भारताचे आर्थिक व लष्करी सामर्थ्य वाढल्यास चीनच्या सर्वस्वासाठी प्रतिबंध करू शकणारा भरवशाचा मित्र रशियाला मिळेल. म्हणून रशिया स्वार्थबुद्धीने भारताला जे दुहेरी साहाय्य देईल ते भारताच्या हिताचे होईल. आता चीन अमेरिकेशीही मैत्री करू पाहात आहे. यामुळे रशिया भारत मैत्रीची गरज आणखी वाढेल. पण रशिया पाकिस्तानशी मैत्री कां करतो ? याचे उत्तर सोपे आहे. आजच्या परिस्थितीत पाकिस्तानला भारताविरुद्ध मदत करणे रशियाला परवडणार नाही. कारण त्यामुळे भारत दुर्बल होईल व पाकिस्तानचा आकार, भौगोलिक स्थान, मागासलेपणा या साऱ्या गोष्टी लक्षात घेता पाकिस्तानचा उपयोग रशियाला मुळीच होणार नाही. आज रशिया पाकिस्तानशी जी मैत्री करू पाहतो आहे तिचा हेतू अमेरिका व चीन यांचे पाकिस्तानमधील वजन कमी करणे आणि रशियाच्या सरहद्दीशेजारी, चीनला हितकारक होतील अशा प्रकारे, भारत पाकिस्तान सरहद्दीवर चालणाऱ्या भारत व पाकिस्तान यांमधील चकमकी थांबविणे हा आहे. ताश्कंद करारापासून रशिया या धोरणानेच वागत आहे. त्यात मूलतः फरक पडण्याचा संभव नाही. अमेरिकेने पाकिस्तानशी मैत्री करून व पाकिस्तानला शस्त्रास्त्रे देऊन भारत पाकिस्तान वैर वाढविले. त्यात अमेरिकेला काश्मीर हवे होते व भारताचे सामर्थ्य वाढायला नको होते. रशियाने पाकिस्तानला शस्त्रे दिली व पाकिस्तानशी मैत्री केली तरी काश्मीर पाकिस्तानात जाणे व भारत दुर्बल होणे या दोन गोष्टी रशियाला अपायकारक आहेत.

याचा अर्थ भारताने सामर्थ्य वाढीचा प्रयत्न काहीच करू नये व रशियावर अवलंबून राहावे असा नव्हे, पण भारताला भरवशाचा मित्रच नाही ही टीका खोटी असून कोणाच्याही साहाय्यावाचून केवळ एकट्याने कोणत्याही परिस्थितीत आत्मरक्षण करता येण्याएवढे सामर्थ्य आज जगातल्या कोणत्याही राष्ट्रात असणारच नाही हे समजून घेतले पाहिजे. या दृष्टीने रशियाला व भारताला एकमेकांच्या साहाय्याची गरज आहे. एक गोष्ट ठाम आहे की भारत दुर्बल होणे व त्यामुळे पाकिस्तान आणि/अथवा चीन यांजकडून भारताचा पराभव होणे हे रशियाला परवडणार नाही. कारण तितके रशियाचे दौर्बल्य त्यामुळे वाढेल. सारांश, आजची ही सारी जागतिक परिस्थिती भारताला उपकारक असून रशियाची मैत्री आपण टिकविली पाहिजे. त्या मर्यादेतच रशियावर टीकाही करावी. पण अंतर्गत आर्थिक दुर्बलता जर आपण वाढू दिली तर रशियालाच भारताच्या मैत्रीचा उपयोग कमी होईल. त्या स्थितीत भारताच्या मैत्रीचा रशिया कंटाळा करील की भारताची अर्थ संघटना सुधारण्यासाठी तीवर ताबा मिळविण्याचाच प्रयत्न करील हे आज सांगता येणार नाही. झेक प्रकरणाने थोडासा इशारा दिलाच आहे. तेव्हा भारताने आर्थिकसामर्थ्य वाढविण्यासाठी झटावे म्हणजे झाले.

• • •






REGD. NO. MH-450

Licence No. 170 to post without pre-payment

FEBRU

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.

अनुक्रमणिका